# प्रस्तावना

सन १८६६ च्या नोव्हेंबर महिन्यांत कपालकुंडला प्रकाशित झाल्यानंतर वंगभाषेच्या साहित्यक्षेत्रांत बंकिमचंद्रांचें स्थान निर्विवाद निर्दिष्ट झालें. बंकिमचंद्र हे स्वतःची प्रतिष्ठा निश्चित झाल्यावर आतां जणूं काय दिग्विजयासाठीं सरसावले होते.

बख्त्यार खिलजीच्या नेतृत्वाखालीं सातशें घोडेस्वारांनीं बंगाल देश पादाक्रांत केला, या अविश्वसनीय कथेमुळें बंगालचा गौरव खंडित झाला होता. ही गोष्ट बंकीमबाबूंच्या मनाला फार लागून राहिली होती. बंगालच्या इतिहासावरचा हा कलंक धुवून काढण्यासाठीं स्वतःच्या कल्पकतेच्या बळावर ते बद्धपरिकर झाले होते. पशुपतीच्या चरित्राचा आश्रय करून त्यावेळच्या बंगाल्यांवरचें तें लांच्छन धुवून काढण्यासाठीं त्यांनीं लेखणी हातीं घेतली. त्या कलंकाचें क्षालन करण्याचा प्रयत्न म्हणजेच ही मृणालिनी कादंबरी.

बारुइपूर आणि अलिपूर इथें डेप्युटी मॅजिस्ट्रट असतांना कपालकुंडला आणि मृणालिनी या दोन्ही कादंबऱ्या लिहिल्या गेल्या आणि प्रकाशित झाल्या. सन १८६९ च्या नोव्हेंबर महिन्यांत मृणालिनी प्रसिद्ध झाली. या संबंधीं शचीशचंद्रबाबू यांनीं लिहिलें आहे.—

" अलिपूर येथें बंकिमचंद्र दहा महिने मात्र होते. सन १८६७ ऑगष्ट पासून सन १८६८ च्या जूनपर्यंतच्या महिन्यांत त्यांनीं मृणालिनी ही कादंबरी लिहून पुरी केली. त्यानंतर १८६८ च्या जून महिन्यापासून त्यांनीं सहा महिन्यांची रजा घेतली होती. या रजेच्या मुदतींत त्यांनीं मृणालिनीचें हस्तलिखित शक्य तितकें दुरुस्त केलें आणि शेवटीं तें पुस्तक छापायला देऊन ते काशीला गेले...मृणालिनी छापून प्रसिद्ध व्हायला एक वर्षापेक्षां जास्त अवधी लागला. रजा संपल्यावर ते अलीपूरला परत आले. तोंपर्यंत मृणालिनीची

छपाई पुरी झाली नव्हती. शेवटीं १८६९ च्या नोव्हेंबर महिन्यांत मृणालिनी प्रसिद्ध करून बंकिमचंद्र बहरमपुराला निघून गेले."

( बंकिमजीवनीवरून, तिसरी आवृत्ती पृष्ठ ९७ ).

मृणालिनीच्या पहिल्या आणि दुसऱ्या आवृत्तीच्या मुखपृष्ठावर बंकिमचंद्रांनीं 'ऐतिहासिक उपन्यास' अशी संज्ञा दिली होती. पुढें बराच विचार करून त्यांनीं 'ऐतिहासिक' विशेषण गाळून टाकलें. तसें पाहिलें तर ही कथा संपूर्णपणें जरी कल्पनेवर आधारलेली होती, तरीही तिच्यांत ऐतिहासिक पार्श्व-भूमीचा पुरेसा आभास उत्पन्न केलेला होता.

'दुर्गेशनंदिनी' या कादंबरीपेक्षां 'कपालकुंडला' या कादंबरींत काव्य-मयतेचें प्रमाण बरेंच मोठें आहे, किंबहुना ती सारीच कादंबरी म्हणजे एक गद्यकाव्य आहे. 'मृणालिनी' देखील काव्यांशाच्या दृष्टीनें अत्यंत उत्कृष्ट आहे. विशेषतः गिरिजाया आणि मृणालिनी यांच्या तोंडीं जीं सुंदर गाणीं घातलेलीं आहेत, ती काव्यकल्पनेच्या दृष्टीनें जितकीं मोहक आहेत, तितकींच बंकिम-चंद्रांच्या काव्यगुणांचीं निदर्शक आहेत. 'इंदिरा' आणि 'आनंदमठ' या दोन कादंबऱ्यांखेरीज इतर कोणत्याही कादंबरींत त्यांनीं अशा प्रकारच्या काव्यांचा समावेश केलेला नाहीं.

पुढल्या काळांत बंकिमचंद्रानीं ज्या कथा लिहिल्या त्यांच्यांत स्वदेशप्रेमाची जी स्फूर्ति दिसून येते, ती 'मृणालिनी' या कादंबरींत असल्याचें दिसून येत नाहीं.

मृणालिनीवर आधारलेलें नाटक पहिल्यानें नॅशनल थिएटरच्या द्वारें तारीख १४ फेब्रुआरी १८७४ रोजीं रंगभूमीवर आलें होतें. या कादंबरीचा एक मराठी अनुवाद 'मासिक मनोरंजन' मधून क्रमशः प्रसिद्ध होऊन नंतर पुस्तकरूपानेंही प्रसिद्ध झाला होता. पुढें भारत गौरव ग्रंथमालेंतही या पुस्तकाचा मराठी अनुवाद प्रसिद्ध झाला होता, पण आज हीं दोन्हीही पुस्तकें उपलब्ध नाहींत.

हाजीकासम वाडी, मुंबई ७.
ता. ७-१-१९५४

भा. वि. वरेरकर

# प्रथम खंड

## —: १ :—

एके दिवशीं प्रयाग तीर्थांतील गंगायमुनेच्या संगमावर पावसाळ्याच्या दिवसांतील सूर्यास्ताची शोभा दिसून आली होती. पावसाळा असला तरी आकाशांत ढग नव्हते—किंवा जे थोडेसे होते तेही सोनेरी लाटांप्रमाणें आकाशांतल्या पश्चिम दिशेला तरळत जात होते.

सूर्य अस्ताला जात होता. पावसाळ्यामुळें गंगायमुना दुथडी भरून वहात होत्या. एका छोट्याशा होडींतून दोघे नावाडी जात होते. यमुनेच्या उलट्या प्रवाहावर ती होडी पुढें चालवणें कठीण जात होतें.

शेवटीं ती होडी प्रयागच्या घाटाला येऊन लागली. त्यांतील एकजण होडींतच बसून राहिला आणि दुसरा कांठाला येऊन उतरला. जो उतरला तो अगदींच तरुण होता. त्याचें शरीर कसलेलें होतें. तो लढवय्याच्या वेषांत होता. तो फारच देखणा होता.

संसारत्याग केलेल्या आणि पुण्यमार्गाच्या प्रयासासाठीं तपश्चर्या करीत असलेल्या बैराग्यांचे आश्रम घाटावर होते, त्यांतल्या एका छोट्याशा झोंपडींत त्या तरुणानें प्रवेश केला.

त्या झोपडींत एक ब्राह्मण कुशासनावर बसून जप करीत होता. तो ब्राह्मण शरीरानें धिप्पाड होता. देह वाळलेला असला तरी त्याच्या चेहऱ्यावर तपस्येचें तेज दिसत होतें. त्याची दाढीमिशी पांढरी शुभ्र होती. कपाळाला टक्कल पडलेलें दिसत होतें. त्याच्या ललाटावर भस्माचा टिळा होता.

येणाऱ्या तरुणानें त्या ब्राह्मणाला प्रणाम केला आणि तो हात जोडून पुढें उभा राहिला. ब्राह्मणानें त्याला आशीर्वाद दिला आणि म्हटलें, "वत्स हेमचंद्र, फार दिवसांपासून मी तुझीच वाट पहात होतों."

हेमचंद्र विनीत भावानें म्हणाला, "अपराधाची क्षमा असावी, दिल्लीचं काम सिद्ध झालं नाहीं, पण यवनांनीं माझा पाठलाग चालवला होता म्हणून मला सावध रहावं लागत होतं, त्यामुळं मला विलंब लागला."

ब्राह्मण म्हणाला, "दिल्लीची सारी हकीगत मला कळली. बख्त्यार खिलजीला हत्तीच्या पायीं दिलं असतं तर उत्तम झालं असतं. देवतेचा शत्रू पशूच्या करवीं मारला गेला असता. त्याचा जीव बचावायला कां गेलास तूं?"

"माझ्या हातानें त्याचा जीव लढाईत घ्यावा म्हणून!" हेमचंद्र म्हणाला, "तो माझ्या बापाचा वैरी. माझ्या बापाच्या राज्याचा त्यानं अपहार केला. तो माझ्याच हातून मेला पाहिजे."

ब्राह्मण म्हणाला, "त्याच्यावर जो हत्ती चिडून चालून गेला होता त्याला तूं मारलंस काय म्हणून? बख्त्यारलाच कां नाहीं मारलंस?"

हेमचन्द्र म्हणाला, "युद्धाशिवाय शत्रूला मारायला मी काय चोर होतों? मगधदेश गिळणाऱ्या माझ्या वैऱ्याला युद्धांत जिंकून माझ्या पित्याचं राज्य मी सोडवणार आहें. नाहींतर मगधराजाचा पुत्र म्हणवून घ्यायचं कशाला?"

ब्राह्मण थोड्याशा कठोरवाणीनें म्हणाला, "या साऱ्या घटना घडल्या त्याला बरेच दिवस झाले. त्यापूर्वी तूं इथं येणार होतास. मग यायला कां उशीर लावलास? मथुरेला गेला होतास तूं?" हेमचन्द्रानें मान खालीं घातली असें पाहून ब्राह्मण म्हणाला, "कळलं! तूं मथुरेला गेला होतास. माझा निषेध तूं मानला नाहींस! ज्या व्यक्तीला भेटायला तूं गेला होतास त्या व्यक्तीची भेट झाली का?"

आतां हेमचन्द्रही थोड्याशा कठोरवाणीनें म्हणाला, "भेट झाली नाहीं ही आपलीच कृपा! आपण कुठं पाठवून दिलं आहे मृणालिनीला?"

माधवाचार्य म्हणाले, "तिला कुठंतरी मी पाठवून दिलं आहे असं तूं कशावरून म्हणतोस?"

"माधवाचार्यांखेरीज ही योजना कोण करील?" हेमचंद्र म्हणाला, "माझी

आंगठी पाहिल्यामुळं मृणालिनी कुठं निघून गेली तिचा पत्ता नाहीं, असं तिची दाई म्हणाली. प्रवासाच्या खर्चासाठीं म्हणून आपण माझी आंगठी मागून घेतली होती. दुसरी कांहींतरी वस्तू देतों असं मी म्हटलं त्यावेळीं आपण आंगठीच हवी म्हणून हट्ट धरला. त्याचवेळीं मला संशय आला होता, पण आपण मागितल्यावर आपल्याला नाहीं म्हणायचं कसं, म्हणूनच ती आंगठी मी बिनतक्रार आपल्या हवालीं केली. माझ्या या बेसावधपणाचं मला चांगलंच बक्षिस दिलंत आपण ! "

माधवाचार्य म्हणाले, " असंच जर असेल तर मग माझ्यावरचा राग आतां सोडून दे. तूं देवकार्य साधणार नाहींस तर दुसरा कोण साधील ? केवळ यवनांच्या नाशावरच तुझं लक्ष केंद्रित झालं पाहिजे. यावेळीं मृणालिनीसाठीं क़शाला गुंतायचं ? पूर्वीं तूं मृणालिनीच्या आशेनं मथुरेला बसून राहिलास म्हणून बापाचं राज्य गमावून बसलास. यवन चाल करून आले त्यावेळीं हेमचन्द्र मथुरेंत न रहातां जर मगध देशांत राहिला असता, तर यवनांनीं मगध देश कसा जिंकला असता ? एवढं झालं तरी देखील तूं मृणालिनीच्या प्रेमांत गुंतून स्वस्थ बसणार आहेस का ? माधवचार्य जिवंत असेपर्यंत असं होऊं द्यायचा नाहीं. म्हणूनच तुला तिचा पत्ता लागणार नाहीं अशाच जागीं मी तिला नेऊन ठेवलं आहे. "

हेमचन्द्र म्हणाला, " आपलं देवकार्य आपणच संभाळा. आतां मी कांहींही करणार नाहीं. "

" तुला दुर्बुद्धि झाली आहे ! " माधवाचार्य म्हणाले, " हीच का तुझी देवभक्ती ? तूं वीर पुरुष आहेस ना ? हेंच का तुझं शिक्षण ? राजवंशांत जन्म घेऊन तूं राज्यविन्मुख होणार आहेस का ? "

" राज्य, शिक्षण, अभिमान जाऊंदेत सारे पाण्यांत बुडून ! " हेमचन्द्र रागारागानें म्हणाला.

" नराधमा, तुला जन्म देण्यासाठीं तुझ्या आईनं नऊ महिने क्लेश भोगले ते एवढ्यासाठींच का ? बारा वर्षंपर्यंत तपश्चर्या सोडून मी तुला विद्यादान केलं तें एवढ्यासाठींच का ? "

माधवाचार्य कपाळावर हात घेऊन बराच वेळ बसले होते. नंतर ते म्हणाले,

" हेमचन्द्र, थोडा धीर धर. मृणालिनी कुठं आहे तें तुला सांगेन—मृणालिनी बरोबर तुझं लग्नही लावून देईन—पण आधीं माझं ऐक, आधीं तुझ्यावर भार टाकलेलं काम पुरं कर."

हेमचन्द्र म्हणाला, " मृणालिनी कुठं आहे तें कळलं नाहीं तोंपर्यंत यवन-वधासाठीं देखील मी शस्त्र हातीं घेणार नाहीं."

" आणि मृणालिनी मेली असली तर ?" माधवाचार्य म्हणाले.

हेमचन्द्राच्या डोळ्यांतून आगीच्या ठिणग्या उडूं लागल्या. तो म्हणाला, " तर मग तें तुमचंच काम !"

माधवाचार्य म्हणाले, " देवकार्याच्या मार्गातला कांटा मी उखडून टाकला असता—पण तें काम मी केलेलं नाहीं. मृणालिनी जिवंत आहे. वाटलं तर तिचा शोध कर. पण आधीं माझ्या आश्रमाच्या बाहेर हो."

हेमचन्द्र एकदम तिथून निघाला. घाटावर येऊन त्यानें नौकेंत बसलेल्या दुसऱ्या नावाड्याला म्हटलें, " दिग्विजय, होडी सोड."

" कुठं जायचं ?" दिग्विजयनें विचारलें.

" कुठं वाटेल तिकडे !" हेमचन्द्र म्हणाला, " यमाच्या घरीं !"

" तें तर अगदींच जवळ आहे !" दिग्विजय म्हणाला. धन्याचा स्वभाव त्याच्या ओळखीचा होता. त्यानें नदीच्या प्रवाहांत होडी सोडून दिली.

हेमचन्द्र बराच वेळपर्यंत मुकाट्यानें बसून राहिला होता. तो एकदम मधेंच म्हणाला, " चल ! होडी फिरव मागं."

दिग्विजयनें होडी पुन्हा आणून घाटाला लावली. एका उडीसरशीं हेमचन्द्र खालीं उतरला आणि पुन्हा माधवाचार्यांच्या आश्रमांत आला. त्याला पाहातांच त्यांनीं विचारलें, " पुन्हा कां परत फिरलास ?"

हेमचन्द्र म्हणाला, " आपली आज्ञा प्रमाण आहे. मृणालिनी कुठं आहे तें मला सांगा."

" तूं सत्यवादी आहेस." माधवाचार्य म्हणाले, " मी खूष झालों आहें. गौड नगरांत एका शिष्याच्या घरीं मी मृणालिनीला ठेवली आहे. तुलाही त्याच गांवीं गेलं पाहिजे आहे, पण तिची तुझी भेट होणार नाहीं. कुणाही पुरुषाशीं तिची भेट होऊं नये असं मी माझ्या त्या शिष्याला बजावलं आहे."

" ठीक आहे. " हेमचन्द्र म्हणाला, " भेट झाली नाहीं तरी चालेल. मला पत्ता मिळाला एवढंच पुरेसं आहे. आतां मी काय करूं तें मला सांगा. "

" दिल्लीला जाऊन तूं यवनांच्या कारस्थानांचा अंदाज काढलास का ? " माधवाचार्यांनीं विचारलें.

हेमचन्द्र म्हणाला, " यवन वंगदेश जिंकायच्या प्रयत्नांत आहेत. बख्त्यार खिलजी सैन्य घेऊन गौडदेशावर चाल करून जाणार आहे. "

माधवाचार्यांची मुद्रा हर्षानें प्रफुल्लित झाली. ते म्हणाले, " शेवटीं देवाला या देशाची दया आली म्हणायची ! "

हेमचन्द्र सारखा त्यांच्या चेहऱ्याकडे नजर लावून पहात होता. माधवाचार्य म्हणाले, " गेले कित्येक महिने मी भविष्याचा पडताळा पहात होतों. तें भविष्य आतां खरं ठरणार. यवनसाम्राज्याचा विध्वंस वंग राज्यापासूनच सुरू होणार. पश्चिमदेशचे ' व्यापारी ' वंग राज्यांत शस्त्र घेऊन सरसावतील त्याचवेळीं यवन-राज्याचा नाश होईल. तुला आठवतं ना, मथुरेला तूं राहिला होतास, मृणालिनीचा शोध करीत होतास, त्यावेळीं तूं तिथं व्यापारी म्हणून वावरत होतास. तूंच तो पश्चिमदेशचा व्यापारी. आतां तयार हो. उद्यां सकाळींच गौडदेशाकडे कूच कर. यवनांबरोबर तूं लढाई केली नाहींस तोंपर्यंत मृणालिनीची आणि तुझी भेट होणार नाहीं."

" आपली आज्ञा मला प्रमाण आहे." हेमचन्द्र एक मोठा सुस्कारा सोडून म्हणाला, " पण मी एकटा, यवनाशीं लढाई कशी करूं ? "

" गौडेश्वराची सेना आहे ! " माधवाचार्य म्हणाले.

" असेल की ! " हेमचन्द्र म्हणाला, " तरी त्याबद्दल मी साशंकच आहें— पण ती सेना माझ्या ताब्यांत कशी येणार ? "

" तूं आधीं पुढं जा." माधवाचार्य म्हणाले, " नवद्वीपला मी तुला भेटेन. गौडेश्वरला मी ओळखतों. पुढं काय करायचं तें मी पाहीन."

" जशी आज्ञा.' असें म्हणून हेमचन्द्र त्यांना प्रणाम करून बाहेर निघाला.

●●●

## —: २ :—

लक्ष्मणावतीला रहाणारा हृषिकेश ब्राह्मण फारसा संपन्न नव्हता कीं दरिद्रीही नव्हता. त्याचें घर अगदीं नीटनेटकें होतें. त्याच्या अंतःपुरांत दोघी तरुणी खिडकीपाशीं बसून चित्रें काढीत होत्या आणि त्याचवेळीं बोलत होत्या. त्यांतली एक दुसरीला म्हणाली, " कां ग मृणालिनी, माझ्या प्रश्नाचं उत्तर दिलं नाहींस ? "

" मणिमालिनी," मृणालिनी म्हणाली, " तूं तुझ्या सुखासमाधाच्या गोष्टी बोल. मी त्या ऐकतें. "

मणिमालिनी म्हणाली, " माझ्या सुखासमाधानाच्या गोष्टी ऐकून ऐकून मी कंटाळलेंय. आतां तुला काय सांगूं ?—हें कमळ मी कसं काढलंय पाहिलंस ? "

" नीटसं झालं नाहीं ! " मृणालिनी म्हणाली, " पाण्यांतून कमळ बरंच वर आलेलं दिसतंय. सरोवरांत तसं होत नाहीं. तें पाण्यावर तरंगलेलं दिसतं. शिवाय याच्या बाजूला दोन कमळाचीं पानं काढ, नाहींतर कमळाची शोभा उठावून दिसत नाहीं. वाटेल तर बाजूला एक राजहंसही काढ—नाहींतर एक खंजन काढ. "

" नाहीं ग बाई ! " मणिमालिनी म्हणाली, " खंजन जाईल उडून. प्रेमाच्या दोरीनं त्याला बांधून ठेवायला ती कांहीं मृणालिनी नव्हे ! "

मृणालिनी म्हणाली, " तर मग या मृणालिनीला जशी तुम्ही पिंजऱ्यांत कोंडून ठेवली आहे, तसाच त्या खंजनालाही पिंजऱ्यांत बंद करून ठेव. "

" मृणालिनीला कोंडून ठेवली आहे ती माधवचार्यांनीं—आम्ही नव्हे, पण मी असं विचारतें, माधवचार्यांनीं सांगितलं म्हणून तूं बापाचं घर सोडून कां आलीस ? "

" मी कांहीं माधवाचार्यांच्या सांगण्यानं इथं आलें नाहीं. त्यांची माझी ओळखसुद्धां नव्हती—मी आलें ती आपखुषीनं नव्हे. एके दिवशीं माझी एक दासी एक आंगठी घेऊन आली आणि तिनं सांगितलं, कीं ती देणारा माणूस बागेंत वाट पहातोय. ती हेमचन्द्राची खुणेची आंगठी होती. मी बागेंत गेलें. तिथें मला हेमचन्द्र भेटणार होता.—"

मणिमालिनी म्हणाली, "मग माधवाचार्यांबरोबर तूं इथं आलीस कशी ?"

मृणालिनी म्हणाली, "दासीनं सांगितलं कीं राजपुत्र होडींत आहे. होडी घाटाला लागली आहे. मी घाटावर येऊन पाहिलं तिथं होडी होती. बाहेरच एक पुरूष उभा होता. मला वाटलं तोच हेमचन्द्र. मी होडीजवळ आलें. जवळ येतांच त्या माणसानं माझा हात धरून मला होडींत ओढलं आणि नावाड्यानं होडी घाटावरून सोडून दिली. हाताला हात लागतांच मी ओळखलं होतं कीं, तो हेमचन्द्र नव्हता. एकदां मोठ्यानं ओरडावं असं मला वाटलं होतं, पण तोंडानं शब्द बाहेर फुटला नाहीं."

"मग पुढं काय झालं ?"

"सुरवातीलाच त्यांनीं मला 'मुली' म्हणून हांक मारली. ते म्हणाले, 'मला तूं मुलीसारखी आहेस. माझं नांव माधवाचार्य—मी हेमचन्द्राचा गुरू—नुसत्या हेमचन्द्राचाच नव्हे, तर या भारतवर्षातले बरेच राजे मला गुरू मानतात. मी एक महत्कार्य हातीं घेतलं आहे, तें सिद्ध होणं आहे हेमचन्द्राच्या हातीं, आणि तूं आहेस त्यांतलं मुख्य विघ्न.' मी म्हटलं, 'मी विघ्न कशी ?' माधवाचार्य म्हणाले, 'यवनांचा पराजय करून पुन्हा हिंदूंच्या राज्याची स्थापना करणं म्हणजे कांहीं सोपं काम नाहीं. हेमचन्द्राखेरीज तें काम दुसऱ्या कुणाकरवीं होणार नाहीं. त्याचं सारं लक्ष या कामावर वेधल्याशिवाय हें कार्य पार पडणार नाहीं. तो तुझ्यापाशीं गुंतून राहिला तर यवनांचा नाश कोण करील ? एवढ्यासाठींच तुला हेमचन्द्रापासून दूर राहिलं पाहिजे. यांतच त्याचं कल्याण आहे. तो राजेश्वर झाला तर तूं त्याची राणी होशील—मग हें तुझं कर्तव्य नाहीं का ? शिवाय तूं कबूल केलं नाहींस तरीही, मी जो बेत केला आहे तो मी पार पाडणारच. मी तुला देशांतराला घेऊन जाणार. गौडदेशांत एका सज्जन ब्राह्मणाच्या घरीं मी तुला ठेवून देणार. तुला तो आपली मुलगी समजून तुझा प्रतिपाळ करील. एक वर्षानंतर मी तुला नेऊन तुझ्या बापाच्या स्वाधीन करीन आणि त्याचवेळीं हेमचन्द्राशीं तुझं लग्न लावून देईन.' त्यांच्या या बोलण्यामुळं म्हण कीं परिस्थितीमुळं म्हण, मी उगीच राहिलें. त्यानंतर मी ही इथं येऊन राहिलें."

●●●

## -: ३ :-

त्या दोन्ही मैत्रिणी अशाप्रकारें बोलत बसलेल्या असतांना बाहेरून कुणाच्यातरी मधूर कंठांतील सुस्वर संगीत त्यांच्या कानीं आलें:—

**मधुरहासिनी शामविलासिनी ।**
**मथुरापुरवासिनी ॥**

" कोण गातंय हें ? " मृणालिनी म्हणाली.

" कुणीतरी बाहेर गातंय खरं. " मणिमालिनी म्हणाली.

पुन्हा गाणें सुरू झालें:—

**निजगृह टाकुनि कां सखि सजणी ।**
**झालिस निर्वासिनी ॥**

" कुणीतरी भिकारीण गाते आहे वाटतं. " मणिमालिनी म्हणाली.

" तिला घेऊन ये पाहूं इकडे." मृणालिनी म्हणाली. मणिमालिनीनें गाणारीला खूण करून आंत बोलावलें. ती भिकारीण आंत आली अन् पूर्वीचें गाणें गाऊं लागलीं:—

**मधुरहासिनी शामविलासिनी । मथुरापुरवासिनी ।**
**निजगृह टाकुनि कां सखि सजणी झालिस निर्वासिनी ॥**
**वृंदावनधन गोपीमोहन टाकुनि कां येशी ।**
**देश देशभर तुज नरसुंदर धुंडित हृषिकेशी ॥**
**विकसित नलिनी यमुनापुलिनीं लागली बहुत तृषा ।**
**त्या शशिकिरणीं मधुर यामिनीं ना मिटली आशा ॥**
**निशिच्या प्रहरीं सांग सुंदरी कुठें भेटशिल गे ।**
**या आशेनें वाजवि मुरलि वनिं कोणासंगें ? ॥**

गाणें संपतांच मृणालिनी म्हणाली, " फार सुंदर गातेस तूं ! मणी, हिला कांहीतरी द्यायला हवं–नको का ? "

तिला कांहींतरी बक्षिसी देण्यासाठीं मणिमालिनी घरांत गेली.

ती गायिका सोळा वर्षांची होती. ठेंगणी होती. काळीसांवळी होती. तिचे दांत कुंदकळ्यांसारखे होते. तिचे ओंठ पिकलेल्या तोंडल्यांसारखे होते. डोळे काळेभोर होते. केंस कुरळे होते. त्या केंसावर तिनें जाईजुईची वेणी घातली होती. तिच्या अंगावर फारसे दागिने नव्हते पण जे कांहीं होते ते एकाद्या वैष्णवीला शोभेसारखेच होते. तिच्या नाकावर चंदनाचा टिळा होता आणि दोन भिवयाच्यामधें तशीच एक चंदनाची टिकली होती.

मृणालिनीनें तिला जवळ बोलावून घेतलें आणि विचारलें, "तुझं नांव काय ग ?"

"माझं नांव गिरिजाया." ती म्हणाली.

"तुझं घर कुठं आहे ?"

"मी याच गांवांत रहातें."

"असं गाण्यावरच पोट भरतेस का तूं ?"

"मग काय करूं ? दुसरं कांहीं येत नाहीं ना मला."

"तूं हीं गाणीं कुठं मिळवलींस ?"

"जिथं मिळतात तिथं मी गाणीं शिकून घेतें."

"हें गाणं कुठं शिकलीस ?"

"एका वाण्यानं शिकवलं मला."

"कुठं रहातो तो वाणी ?"

"याच गांवांत रहातो तो !"

मृणालिनीचा चेहरा आनंदानें फुलला. तिनें विचारलें, "वाणी करतात व्यापार—हा वाणी कसला व्यापार करतो ?"

"सगळे करतात तसलाच व्यापार करतो तो !" गिरिजाया म्हणाली.

"पण तो कसला व्यापार ?"

"कथेचा व्यापार."

"हा नवाच व्यापार दिसतो !" मृणालिनी म्हणाली, "या व्यापारांत नफा नुकसान काय होतं ?"

"यांत नफा म्हणजे प्रेम !" गिरिजाया म्हणाली, "अन् नुकसान म्हणजे भांडण."

" हाच व्यापार करते आहेस वाटतं तूं ? " मृणालिनीनें विचारलें, " कोण आहे तुझा हा सावकार ! अन् तूं कोण त्याची ? "

" तोच आहे माझा सावकार आणि माझं मुद्दलही देतो तोच. " गिरिजाया म्हणाली.

" मग तुझा माल काय असेल तो दाखव पाहूं मला. " मृणालिनी म्हणाली.

" दाखवायचा माल नव्हे तो. " गिरिजाया म्हणाली, " हवं तर ऐका. "

" ठीक आहे—ऐकतें. " मृणालिनी म्हणाली. तेव्हां गिरिजाया गाऊं लागली :—

**यमुनेच्या खोल डोहीं। निधि हाताला लागला।**
**झांप दिली पाण्याखालीं। काढायाचा यत्न केला॥**
**रत्न एक हातीं आलें। पारखलें कुतूहलें।**
**कवटाळिलें आनंदानें। घरीं घेऊनियां आलें॥**
**निज लागली सुखाची। कोणा नाहीं जाग आली।**
**घरीं रिघे एक चोर। रत्नावरी घाला घाली॥**
**हृदयावरी राहे पंकज। केला यत्न झालों राजी।**
**कुठें गेलें तें कमळ। कुठें मृणालिनी माझी॥**

" मृणालिनी का ? " मृणालिनीनें विचारलें, " मी तिचा पत्ता सांगतें, ध्यानांत राहील का तुझ्या ? "

" हो राहील ध्यानांत. " गिरिजाया म्हणाली.

मृणालिनी गाऊं लागली :—

**विधि-कंटकिता मृणाल पाण्यावरती।**
**आशेनें डुंबत होती॥**
**नभिं दृष्टि पडे राजहंस मधुकाय।**
**कवळुनि धरि त्याचे पाय॥**
**वद जाशि कुठें विहरत ठायीं ठायीं।**
**मम हृदयकमलिं तूं राहीं॥**

मग येउनि तो बसतां त्या हृत्कमलीं ।
कंपिता मृणालिनि झाली ॥
कालाचा आला घाला ।
कृष्णमेघ नभिं उद्भवला ॥
मग मराल उडुनि गेला ।
हृदयभंग त्यानें केला ॥
त्या वेगानें देंठ तुटोनी खालीं बुडुनिया मृणालिनी गेली ॥

मृणालिनी म्हणाली, " काय ग गिरिजाया, हें गाणं तुझ्या ध्यानांत राहील का ? "

" राहील तर ! " गिरिजाया, म्हणाली, " गाण्याचे शब्द तर राहातीलच ध्यानांत, पण गाणारणीच्या डोळ्यांतलीं आसवंसुद्धां आठवीन अन् तस्सं म्हणून दाखवीन. "

मृणालिनी गिरिजायेला तें गाणें शिकवूं लागली.

मणिमालिनी मृणालिनीची सखी होती. तिला सारें कांहीं माहीत होतें—पण बापाच्या विरुद्ध जाऊन कोणतीही गोष्ट करायचा धीर तिला झाला नसता म्हणून मृणालिनीनें तिच्यापासून हें सारें कारस्थान लपवून ठेवलें.

अजून मणिमालिनी आली नव्हती. मृणालिनी गिरजायेला म्हणाली, " आज आतां अधिक कांहीं नको. तुझ्या सावकाराला मला भेटायचं आहे. उद्यां तुझा मालाचा बोजा घेऊन ये. त्यांत खरेदी करण्याजोगं कांहीं असलं तर मी घेईन विकत. "

गिरिजाया जायला निघाली. तिला बक्षिसी द्यायचें मृणालिनी विसरूनच गेली होती. ती चारदोन पावलें गेली नाहीं तोंच मणिमलिनी थोडे तांदूळ, डाळ, एक जुनें वस्त्र आणि थोड्या कवड्या घेऊन आली. मृणालिनीनेंही आपलें एक जुनाट वस्त्र तिला दिलें. तें द्यायच्या वेळीं तीं हळुच तिच्या कानाला लागून म्हणाली, " आतां मला धीर धरवत नाहीं. उद्यांपर्यंत वाट पहाणं कठीण जाईल. तूं आजरात्रीं एक प्रहर उलटल्यावर या घराच्या उत्तरेकडच्या खिडकीखालीं ये. मी तुला भेटेन. जमलं तर तुझ्या सावकाराला बरोबर घेऊन ये. "

" कळलं. " गिरिजाया म्हणाली, " मी नक्की येतें. "

गिरिजाया गेल्यावर मृणालिनी मागें फिरली तेव्हां मणिमालिनीनें तिला विचारलें, " काय ग सांगत होतीस तिच्या कानांत ? "

मृणालिनी म्हणाली, " माझ्या गाण्याचे शब्द पुन्हां सांगत होतें ! "

●●●

## -: ४ :-

लक्ष्मणावती नगरीच्या एका विभागांत सर्वधन नांवाच्या वाण्याच्या घरीं हेमचन्द्र रहात होता. त्या घराच्या समोर एक अशोकवृक्ष होता. तिसऱ्या प्रहरीं हेमचन्द्र या अशोकाच्या खालीं बसून कुणाची तरी वाट पहात होता. तितक्यांत त्याचा नोकर दिग्विजय आला, त्याला त्यानें विचारलें, " अजून ती भिकारीण आली नाहीं का दिग्विजय ? काय झालंय कोण जाणे ! तूं जाऊन एकदां तिचा तपास कर. "

" जशी आज्ञा. " म्हणून दिग्विजय गांवाकडे निघाला. वाटेंत त्याला गिरिजाया भेटली. तिनें विचारलें, " कुठं चालला आहेस दिव्यजय ? "

" माझं नांव आहे दिग्विजय. " तो म्हणाला.

" कुठल्या दिशेचा विजय करायला निघाला आहेस ? "

" तुझ्याच दिशेला, " दिग्विजय म्हणाला, " पण तूं आहेस अंधकार. चल आतां. मालक तुला बोलावताहेत."

" कशाला बोलवताहेत ? "

" तुझ्याबरोबर माझं लग्न लावून देणार आहेत वाटतं ! " तो म्हणाला.

" तुझ्या तोंडाला आग लावायला दुसरं कुणी मिळत नाहीं वाटतं ? " ती म्हणाली.

" नाहीं ! " तो म्हणाला, " तूंच आहेस या कामाला लायक. आतां चल. "

गिरिजायेला घेऊन दिग्विजय हेमचन्द्रापाशीं आला. तिला पहातांच हेमचन्द्राचा चेहरा उजळून उठला. त्यानें विचारलें, " आलीस का गिरी ? आशा मिटली का ? "

" कुणाची आशा ? " गिरिजाया म्हणाली, " तुमची कीं माझी ? तुमच्यासारख्या मोठ्या लोकांची आशा असते अघाशी. आम्ही गरीब माणसं थोडक्यांत खूष होतों ! "

"मीही थोडक्यांत खूष होईन." हेमचन्द्र म्हणाला, "मृणालिनी जर भेटली तर—"

"भेटली तर मीही सांगेन तिला." गिरिजाया म्हणाली.

हेमचन्द्र निराश झाला. गिरिजाया त्याला प्रणाम करून जायला निघाली तेव्हां हेमचन्द्रानें तिला विचारलें, "तूं हंसत नाहींस, पण तुझे डोळे हंसताहेत. तुझं गाणं ऐकून कुणी कांहीं विचारलं का तुला ?"

"कोण विचारणार ?" गिरिजाया म्हणाली, "एक सटवी मला मारायला आली होती—म्हणाली, 'श्यामसुंदरासाठीं मथुरावासिनीला एवढी तळमळ कसली लागली आहे ?"

हेमचन्द्रानें एक मोठा सुस्कारा सोडला. तो म्हणाला, "सारी मेहनत फुकट गेली ! उद्यां मी जातों कुठं तरी."

गिरिजाया गाऊं लागली:—

**विधि-कंटकिता मृणाल पाण्यावरती ।**
**आशेनें डुंबत होती ॥**
**नभिं दृष्टि पडे राजहंस मधुकाय ।**
**कवळुनि धरि त्याचे पाय ॥**

"हें गाणं तुला कुणी शिकवलं गिरिजाया ?" हेमचन्द्र म्हणाला.

गिरिजाया हंसली आणि तिनें मृणालिनीनें शिकवलेलें सारें गाणें गाऊन दाखवलें.

हेमचन्द्र गहिंवरून आला. भरल्या गळयानें तो तिला म्हणाला, "ही-हीच माझी मृणालिनी ! कुठं भेटली तुला ती ?"

गिरिजाया म्हणाली, "मृणालिनी असते मृणालावर—"

"थट्टा पुरे कर !" हेमचन्द्र चिडून म्हणाला, "कुठं भेटली ती तुला ?"

"हृषिकेश शर्मा यांच्या घरीं !" गिरिजाया म्हणाली.

"कुठं आहे त्याचं घर ?" हेमचन्द्रानें विचारलें.

गिरिजाया म्हणाली, "पहिल्यानं इथून उजवीकडे वळायचं, मग पूर्वेकडे जायचं, तिथून उत्तरेकडे जायचं, त्यानंतर पश्चिमेकडे वळलं कीं—"

हेमचन्द्र तिच्यावर गुद्दा उगारून म्हणाला, " थट्टा पुरे कर. नाहीतर तुझं टाळकं फोडीन. "

" शांत व्हा. " गिरिजाया म्हणाली, " रस्ता सांगून तुम्हाला कसा कळेल? हवंतर मीच तुम्हाला तिथं घेऊन जाईन. "

" ईश्वर तुझं कल्याण करो! " हेमचन्द्र म्हणाला, " कशी काय आहे ती? "

" तशी दिसायला बरी आहे. " गिरिजाया म्हणाली, " आंगावर दागिने आहेत, चांगली उंची वस्त्रं नेसते,—हृषिकेशाची मुलगी आहे तिची मैत्रीण—"

" आतां खरोखरच तुझं टाळकं फोडीन. " हेमचन्द्र म्हणाला, " दिसतेस एवढीशी, पण तुझ्यासारखी महादुष्ट मुलगी मी कुठं पाहिली नाहीं. तिची प्रकृती कशी आहे तें सांग मला. "

" असे सरळ वाटेवर या. " गिरिजाया म्हणाली, " तुम्हाला भेटायचं आहे ना तिला? ठीक! तर आज प्रहर रात्र उलटल्यावर माझ्याबरोबर या. "

हेमचन्द्र अस्वस्थ झाला. क्षणभर तो तिथें येरझारा घालूं लागला. तिला जरा थांबायला सांगून तो घरांत गेला आणि कांहीं वेळानें परत आला. एक पत्र गिरिजायेच्या हातीं देऊन तो म्हणाला, " सध्यां मला मृणालिनीची भेट घेतां येत नाहीं. तूं रात्रीं तिथं जा, हें पत्र तिच्या हातीं दे आणि तिला सांग, ' देवाची दया झाली तर एक वर्षांत तुला भेटायला येईन. ' यावर मृणालिनी काय बोलते तें मला येऊन सांग. "

गिरिजाया निघून गेली. हेमचन्द्र बराच वेळपर्यंत अशोकवृक्षाखालच्या हिरवळीवर पडून राहिला होता. तो आकाशाकडे पहात होता. त्याच्या मनांत भयंकर खळबळ माजली होती. तितक्यांत कुणीतरी त्याला हाताला धरून हालवलें. त्यानें पाहिलें तो समोर माधवाचार्य उभे होते.

माधवाचार्य म्हणाले, " वत्सा, ऊठ! मी तुझ्यावर अगदीं खूष झालों आहें—तितकाच नाखूषही झालों आहें. मला पहातांच तूं असा चकित झाल्यासारखा कां पहातो आहेस माझ्याकडे? "

हेमचन्द्र म्हणाला, " आपण कुठून आलांत इथं? "

त्याच्या प्रश्नाचें सरळ उत्तर न देतां माधवाचार्य म्हणाले, " अजून तूं

नवद्वीपला गेला नाहींस, वाटेंत वेळ घालवतो आहेस, हें पाहून मी नाखूष झालों! अन् मृणालिनीचा पत्ता लागला असतांही दिलेलं वचन पुरं करण्यासाठीं तूं तिला भेटला नाहींस, हें पाहून मी खूष झालों! आतां जास्त उशीर लावूं नकोस. वेगवान हृदयाचा विश्वास धरूं नये! आज मी नवद्वीपला जाणार आहें, तूं माझ्याबरोबर चल. होडी तयार आहे. कांहीं अस्त्रं शस्त्रं असतील तीं घरांत जाऊन घेऊन ये आणि माझ्याबरोबर चल."

एक मोठा सुस्कारा सोडून हेमचन्द्र म्हणाला, "ठीक आहे. मी आतां साऱ्या आशा आकांक्षांवर पाणी सोडलं आहे. चलावं! पण आपण आहां तरी कोण? जादुगार कीं अंतर्यामी?"

माधवाचार्य हंसले.

हेमचन्द्र घरांत जाऊन घरवाल्या व्यापाऱ्याचा निरोप घेऊन आला. आपली चीजवस्त एका मजुराच्या खांद्यावर देऊन तो आचार्यांच्या मागोमाग निघाला.

●●●

## —: ५ :—

मृणालिनी किंवा गिरिजाया या दोघींतल्या कुणीही भेटीची ठरलेली वेळ विसरल्या नव्हत्या. प्रहर रात्रीनंतर दोघीही हृषिकेशच्या घराच्या मागल्या बाजूला भेटल्या. गिरिजायेला पहातांच मृणालिनी म्हणाली, "हें काय? हेमचन्द्र कुठं आहे?"

"ते आले नाहींत," गिरिजाया म्हणाली, "हें पत्र दिलंय त्यांनीं." असें म्हणून तिनें तें पत्र तिच्या हातीं दिलें.

मृणालिनी म्हणाली, "आतां हें वाचायचं कसं? घरांत जाऊन दिवा लावून आणायला गेलें तर मणिमालिनी जागी होईल."

"त्याची काळजी नको." गिरिजाया म्हणाली, "मी चकमक आणि दिवा घेऊन आलें आहें. आतांच तो पेटवून देतें."

गिरिजायेनें चकमक चालवून दिवा पेटवला. तो चकमकीचा आवाज घरांतल्या एका माणसाच्या कानीं गेला. त्यानें तो दिवा पेटवलेलाही पाहिला.

दिवा पेटवल्यानंतर मृणालिनी पत्र वाचूं लागली, त्यांत असा मजकूर होता—

" मृणालिनी ! या पत्रांतून तुला काय लिहूं ? माझ्यापायीं तूं घरदार टाकून दुसऱ्याच्या घरीं कष्टांत दिवस कंठीत आहेस. दैवयोगानें मला तुझा पत्ता लागला पण तुझी भेट घेणें मला अशक्य झालें आहे. एवढ्या-साठीं तूं मला दोष देणार नाहींस—मी आपलें प्रेम विसरलों असें म्हणणार नाहींस, अशी माझी खात्री आहे. मी एक विशेष व्रत घेतलें आहे. त्या व्रताचा भंग झाला तर मी कुलांगार ठरेन. तें व्रत पुरें करण्याची मी माझ्या गुरूपाशीं प्रतिज्ञा केली आहे, कीं या जागीं मी तुझी भेट घेणार नाहीं. तुझ्यासाठीं मी व्रतभंग केला तर तें तुलाही रूचणार नाहीं हें मी जाणतों. म्हणून कसेंबसें हें एक वर्ष काढ. ईश्वर प्रसन्न झाला तर लवकरच मी तुला राजस्नुषा करून तुझी इच्छा पूर्ण करीन. हें पत्र घेऊन जाणाऱ्या अल्पवयी पण बुद्धिमती बालिकेबरोबर या पत्राचें उत्तर पाठवून दे. "

पत्र वाचून झाल्यावर मृणालिनी गिरिजायेला म्हणाली, " गिरिजाया, इथं माझ्यापाशीं कागद लेखणी कांहीं नाहीं. तूं माझं तोंडी उत्तर त्यांना जाऊन कळव. "

" उत्तर कुणाला सांगूं ? " गिरिजाया म्हणाली, " माझ्याकडे पत्र देतांना त्यांनीं आज रात्रींच मला उत्तर आणून दे असं म्हटलं होतं, मी ही कबूल केलं होतं, पण निघायच्या वेळीं मला आठवलं, कीं इथं यावेळीं लिहायचं सामान मिळायचं नाहीं, म्हणून तें घेण्यासाठीं मी परत गेलें त्यावेळीं त्यांची माझी भेट झाली नाहीं. मला कळलं, कीं ते संध्याकाळींच आपल्या गुरूबरोबर नवद्वीपला गेले."

मृणालिनी म्हणाली, " पुन्हा माधवाचार्य ! हे माधवाचार्यच आहेत माझे वैरी ! "

थोडावेळ विचार करून मृणालिनी म्हणाली, " तूं आतां इथून जा बघूं. यापुढं मी घराबाहेर रहाणं बरं नाहीं. "

तिचा निरोप घेऊन गिरिजाया गात गात निघाली, तिचें गाणें ऐकत ऐकत मृणालिनी पुन्हा घरांत आली. आंत आल्याबरोबर ती दार बंद करून घेत होती

तोंच कुणीतरी मागून येऊन तिचा हात धरला. ती बिचकली. हात धरणारा तो माणूस म्हणाला, "अग साध्वी, बरी सांपडलीस! कोण आहे तुझं हें प्रियपात्र?"

मृणालिनी रागानें थरथर कांपत म्हणाली, "कोण? व्योमकेश! ब्राह्मण-कुलाधमा, माझा हात सोड!"

व्योमकेश हा हृषिकेशाचा मुलगा. तो महामूर्ख आणि दुराचारी होता. पहिल्यापासूनच त्याची मृणालिनीवर नजर होती. आपली अभिलाषा पुरी होण्याचें लक्षण न दिसल्यानें तो तिच्यावर अशी बळजबरी करायची संधी पहात होता. मृणालिनीबरोबर मणिमालिनी सदोदित रहात असल्यामुळें त्याला हा वेळपर्यंत संधी मिळाली नव्हती. आतां तिनें झटकतांच तो म्हणाला, "कां सोडूं तुझा हात? तूं सहज हातीं सांपडली आहेस—माझं म्हणणं ऐकून घे. एकाला खूष करायला निघाली होतीस, मग दुसऱ्याला देखील कां खूष करीत नाहींस?"

मृणालिनी म्हणाली, "आतां हात सोडला नाहींस तर मोठ्यानं ओरडून घरांतल्या साऱ्या माणसांना जागीं करीन."

"खुशाल ओरड!" तो म्हणाला, "मी एक अभिसारिका पकडली आहे असं त्यांना सांगेन."

"तर मग जा नरकांत!" असें म्हणून तिनें हात झटकून सोडवायचा प्रयत्न केला, पण तें तिला साधलें नाहीं.

व्योमकेश म्हणाला, "अशी उतावीळ होऊं नकोस. माझे मनोरथ पूर्ण झाले कीं मी तुला सोडून देईन. आतां कुठं आहे ती तुझी बहीण मणिमालिनी?"

"मीच आहें तुझी बहीण!" मृणालिनी म्हणाली.

"तूं आहेस माझी राधिका!—" व्योमकेश म्हणाला. मृणालिनीनें त्याला एक लाथ मारली तेव्हां तो म्हणाला, "अहाहा! आज मी धन्य झालों. तुझ्या पायाचा मला लाभ झाला! सुंदरी, तूं माझी द्रौपदी—मी तुझा जयद्रथ."

मागून कुणीतरी बोललें, "आणि मी तुझा अर्जुन!" एकदम व्योमकेशनें किंकाळी फोडली, "विष आहे का तुझ्या दांतांत?" असें म्हणून मृणालिनीचा हात सोडून तो आपली पाठ चोळूं लागला. त्याच्या हाताला रक्त लागलें.

त्यानें हात सोडला तरी मृणालिनी पळून गेली नाहीं. तीही त्याच्याइतकीच

आश्चर्यचकित झाली होती. तो कोल्ह्यासारखा त्याच्या पाठीचा जो चावा घेतला होता तो तिनें नव्हे. नक्षत्राच्या अंधुक प्रकाशांत बाजूला सरत असलेली छोटीशी बालिका मृणालिनीला दिसली.

मृणालिनीचा पदर ओढून गिरिजाया म्हणाली, "आतां पळ काढ इथून!" असे म्हणून ती स्वतः पळत सुटली. मृणालिनी पळाली नाहीं. व्योमकेश अंगणांत राहून आरडाओरडा करतो आहे असें पाहून ती आपल्या शेजघराकडे निघाली. तितक्यांत व्योमकेशाचा आरडाओरडा ऐकून हृषिकेश बाहेर आला. त्यानें ओरडण्याचें कारण मुलाला विचारलें, "काय झालं आहे रे! रेड्या-सारखा कां ओरडतोयस?"

व्योमकोश म्हणाला, "मृणालिनी कुणातरी अपरिचित पुरुषाबरोबर जात होती, तिला मी पकडायला गेलों तेव्हां तिनं माझ्या पाठीचा चावा घेतला." हृषिकेषला आपल्या मुलाचे चाळे माहीत नव्हते. मृणालिनी अंगणांतून घरांत जात असलेली पाहून त्याला तो आरोप खरा वाटला. त्यावेळीं तो मृणालिनीला कांहीं बोलला नाहीं. मुकाट्यानें तिच्या मागोमाग तिच्या झोंपायच्या खोलींत आला.

● ● ●

## —: ६ :—

हृषिकेश मृणालिनीसमोर उभा राहिला आणि म्हणाला, "हें काय चाललंय? तूं कोण कुणाची, कशी आहेस तें मला माहीत नाहीं. गुरूच्या आज्ञेनं मी तुला माझ्या घरांत स्थान दिलं. माझ्या मुलीबरोबर तूं एका शय्येवर झोंपतेस—ही कुलटेची वृत्ती कां सुचली तुला?"

"मला कुलटा म्हणेल तो खोटारडा आहें!" मृणालिनी म्हणाली.

हृषिकेश रागानें थरथर कांपूं लागला. तो म्हणाला, "पापिणी, माझं अन्न खातेस आणि मलाच शिव्या देतेस! बाहेर हो माझ्या घरांतून. माधवाचार्य नाराज होतील या भयानं देखील मी तुझ्यासारख्या नागिणीला माझ्या घरांत थारा देणार नाहीं."

"ठीक आहे!" मृणालिनी म्हणाली, "उद्यां सकाळीं मी तुम्हाला इथं दिसणार नाहीं."

आपण 'बाहेर हो' म्हणतांच ती घाबरली नाहीं, जायला निघाली, त्या अर्थी आपल्या जाराच्या घरीं आसरा मिळण्याची तिला खात्री असावी असें वाटून अधिकच संतापून हृषिकेश म्हणाला, "उद्यां कशाला? आतांच नीघ इथून."

"जशी आज्ञा!" मृणालिनी म्हणाली, "मणिमालिनीचा निरोप घेतें—"

"मणिमालिनी तुझ्यासारख्या कुलटेशीं बोलणार नाहीं!"

"बरं आहे तर!" मृणालिनी म्हणाली, "मी अशीच एक वस्त्रानं इथून निघून जातें. आपल्याला प्रणाम करतें!" असें म्हणून त्याला नमस्कार करून ती लगेच बाहेर पडली.

व्योमकेशच्या आरडाओरडीमुळें मणिमालिनीही जागी झाली होती. मृणालिनी निघून जाते आहे असें पाहून ती तिला म्हणाली, "अशा रात्रीच्या वेळीं तूं जाशील कुठं?"

"ईश्वर तुला सुखी ठेवो!" मृणालिनी म्हणाली, "माझ्याबरोबर बोलूं नकोस. तुझ्या बापानं बंदी केली आहे."

"असं काय म्हणतेस मृणालिनी?" मणिमालिनी म्हणाली, "बाबा तुला काय बोलले कोण जाणे, पण तूं जाऊं नकोस—मागें फिर."

तिची विनवणी फुकट गेली. मृणालिनीनें तिचें ऐकलें नाहीं. ती बाहेर येऊन पहाते तों गिरिजाया तिथें उभी होती. तिला पहातांच मृणालिनीनें विचारलें, "तूं अजून आहेस का इथं?"

"मी तुम्हाला पळून यायला सांगितलं होतं ना?" गिरिजाया म्हणाली, "मी तुमची वाट पहात राहिलें होतें."

"त्या ब्राह्मणाला तूंच का चावलीस?" मृणालिनीनें विचारलें.

"मग त्यांत काय बिघडलं? ब्राह्मण म्हणजे काहीं गाय नव्हे!"

"पण तूं गात गात निघून गेलीस असं मला वाटलं"

"जात होतें खरी, पण इथं शब्दाशब्दी झालेली ऐकली, मागं येऊन पाहूं लागलें—मेला मला 'काळी मुंगी' म्हणाला होता परवां. तें त्या दिवसाचं ऋण आज त्याचा चावा घेऊन फेडलं.—आतां कुठं जाणार आहां तुम्ही?"

"तुझं कांहीं घरदार आहे का?" मृणालिनीनें विचारलें.

"आहे आपलं एक मोडकं तोडकं घर." गिरिजाया म्हणाली, "एक

म्हातारी रहाते तिथं, तिला मी आई म्हणतें. तुम्ही चला तिथं—" ती यायला निघाली तेव्हां गिरिजाया म्हणाली, " पण तें एवढंसं खोपट. तुम्ही कशा रहाणार तिथं ? कसे दिवस काढणार ? "

" उद्यां सकाळीं दुसऱ्या कुठं तरी जाऊं. "

" दुसऱ्या कुठं म्हणजे कुठं ? मथुरेला ? "

" नाहीं ! " मृणालिनी म्हणाली, " यमाच्या घरीं !—उगी कां राहिलीस ? खरं वाटत नाहीं तुला ? "

" खरं कां वाटायचं नाहीं ? " गिरिजाया म्हणाली, " सर्वांचंच घर आहे तें. कुणाला केव्हांही जातां येईल तिथं ! आणखी एक जागा आहे, तिथं कां नाहीं जात ? "

" कुठं ? "

" नवद्वीपला. " गिरिजाया म्हणाली.

" तूं भिकारीण आहेस कीं जादुगारीण आहेस ? " मृणालिनी म्हणाली, " नवद्वीपलाच जायचं मी ठरवलं होतं. "

" एकट्याच जाणार कां तिकडे ? "

" मला कोण सोबत मिळणार दुसरी ? " मृणालिनी उद्गारली.

" मी आहें ना ? "

" खरोखरच येशील का तूं ? "

" कां येऊं नये ? " गिरिजायेनें विचारलें, " माझ्यालेखीं सारीं गांवं समान आहेत. राजधानी आहे ती—खूप खूप भिक्षा मिळेल तिथं मला ! "



# द्वितीय खंड

## —: १ :—

अत्यंत विस्तीर्ण अशा सभामंडपांत चोहींकडे दिवे पाजळलेले होते. राजाधिराज गौडेश्वर सिंहासनावर विराजमान झाले होते. भालदार चोपदार पुकारा करीत होते. शरीर-रक्षक दोन्ही बाजूला रांग करून उभे होते. सर्वांच्यापासून वेगळ्या असलेल्यां एका कुशासनावर पंडितवर माधवाचार्य बसून राहिले होते.

राजसभेचें नित्यकार्य समाप्त झाल्यावर सभाभंगाला सुरवात झाली. इतर लोक निघून गेल्यावर माधवाचार्य म्हणाले, “ महाराज, आपण राजनीति-विशारद आहां. आज जे कुणी इतर राजे आहेत त्यांच्यापेक्षां आपण दूरदर्शी आहां. आपण जाणतांच, कीं शत्रुदमन हाच राजाचा प्रधान धर्म—आपल्या प्रबल शत्रूच्या नाशासाठीं आपण काय उपाय केला आहे ? ”

राजा म्हणाला, “ आपली काय आज्ञा आहे ? ”

राजा वृद्ध झाल्यामुळें त्याची स्मरणशक्ती मंदावली होती, हें माहीत असल्या-मुळें धर्माधिकारी पशुपती म्हणाले, “ महाराजाधिराज, राजशत्रूचा नाश करण्यासाठीं आपण कोणती योजना केली आहे, असं माधवाचार्य विचारीत आहेत. अजूनपर्यंत वंगेश्वरावर कुणीच चाल करून गेलेलें नाहीं तें आचार्यांनीं सांगितलं नाहीं. त्याबद्दल काय म्हणणं आहे आचार्यांचें ? ”

माधवाचार्य थोडेसे हंसले. शक्य तितका मोठा आवाज काढून ते म्हणाले, “ महाराज, तुर्कांनीं बहुतेक सारा आर्यावर्त हस्तगत केला आहे. आतां ते मगध-देश जिंकून गौडराज्यावर चाल करून जायच्या तयारींत आहेत. ”

आतां आचार्यांचें भाषण राजाच्या कानीं गेलें. तो म्हणाला, " तुर्कांबद्दल बोलतांहां का आपण ? तुर्क चाल करून आले आहेत का ? "

" ईश्वर करो आणि तसं न होवो ! " माधवाचार्य म्हणाले, " पण ते चाल करून आले तर काय करणार आहां आपण ? "

" मी काय करणार ? " राजा म्हणाला, " मी हा असा म्हातारा झालेला, लढाई करणं माझ्या हातून व्हायचं नाहीं, आतां गंगालाभ झाला कीं मिळवली. तुर्क येणार असले तर येऊं दे ! "

राजांचें भाषण ऐकून सभेंतील सारे लोक तटस्थ झाले. केवळ महासामंताच्या म्यानांतील तलवार झणाणली. माधवाचार्यांच्या डोळ्यांतून खळकन् एक आसूं खालीं पडलें.

महापंडित दामोदर म्हणाले, " आचार्यांना वाईट वाटलं का ? राजेसाहेब म्हणाले तेंच खरं. शास्त्रांत सांगितलं आहे कीं तुर्की लोक हा देश पादाक्रांत करतील. जें होणारच आहे तें चुकवण्यासाठीं उगीच लढाई कशाला करायची ? "

" कोणत्या शास्त्रांत सांगितलं आहे हें ? " माधवाचार्यांनीं विचारलें.

" विष्णुपुराणांत आहे वाटतं—" दामोदर पंडित म्हणाले.

" मला ' वाटतं ' नको, " माधवाचार्य म्हणाले, " विष्णुपुराणांत असं कुठं म्हटलंय तें मला आणून दाखवा. "

" विष्णुपुराणांत नव्हे वाटतं, " दामोदर पंडित म्हणाले, " मनुस्मृतींत असेल. कोणत्या ग्रंथांत तें मला आठवत नाहीं, पण तुम्हीं म्हणाल तर मी तो श्लोक तुम्हाला म्हणून दाखवीन. "

" पुरे पुरे ! " माधवाचार्य म्हणाले, " गौडेश्वराच्या सभापंडिताला अनुष्टुप् छंदांत नवी कविता रचून म्हणणं कांहीं कठीण नाहीं. मी सांगतों, तुर्की लोक गौड देश जिंकतील असं भविष्य कोणत्याही ग्रंथांत लिहिलेलं नाहीं. "

" ठीक आहे ! " पशुपती म्हणाला, " यवन आला तर आम्ही लढाई करूं. "

" आतां हें मात्र वीरोचित बोललां. " माधवाचार्य म्हणाले, " मी एवढंच विचारतों, कीं असा प्रसंग आला तर आपण युद्धाची कोणती तयारी केली आहे ? "

" असल्या गोष्टींची उघड्या सभेंत वाच्यता करणं योग्य नव्हे, " पशुपती

म्हणाला, " पण थोडक्यांत सांगायचं म्हणजे आमची सर्व प्रकारची सामग्री जय्यत तयार आहे. आपली काय योजना आहे आचार्य ? "

" माझा प्रस्ताव असा आहे, " माधवाचार्य म्हणाले, " एक वीरपुरुष यावेळीं इथं आला आहे. मगध देशाचा युवराज हेमचन्द्र याचं नांव आपण ऐकलंच असेल. "

" हो ऐकलं आहे खरं. " पशुपती म्हणाला, " अन् तो आचार्यांचा शिष्य आहे हेंही आम्ही ऐकलंय, पण या वीरपुरुषाचं राज्य शत्रूनं जिंकलं कसं ? "

" यवन चाल करून आले त्यावेळीं युवराज प्रवासांत होता, " माधवाचार्य म्हणाले, " त्याचाच तो परिणाम. "

पशुपतीनें विचारलें, " युवराज नवद्वीपांत आले आहेत का ? "

" हो, आले आहेत, " माधवाचार्य म्हणाले, " त्यांचा शत्रू याही देशावर चाल करून येतो आहे असं कळल्यामुळं या देशांत शत्रूला तोंड देऊन त्याला धूळ चारण्यासाठीं ते आले आहेत. गौडराजांनीं त्याच्याशीं संधी करावा आणि उभयतांच्या मदतीनं शत्रूचा निःपात व्हावा, यांतच उभय देशाचं कल्याण आहे. एवढंच माझं मागणं. "

" ठीक आहे ! " पशुपती म्हणाले, " युवराजांची इथं योग्य ती व्यवस्था करण्यांत येईल. त्यांनीं इथं वाड्यांतच रहावं. योग्यवेळीं आपण संधीचीं बोलणीं करूं. "

त्यानंतर राजाज्ञेनें सभा विसर्जन झाली.

● ● ●

## —: २ :—

राजधानीच्या उपनगरांतील गंगेच्या कांठच्या एका राजवाड्यांत हेमचन्द्राच्या रहाण्याची व्यवस्था केली होती. माधवाचार्यांच्या योजने-प्रमाणें हेमचन्द्रानें त्या वाड्यांत तळ दिला होता.

नवद्वीपांत जनार्दन नांवाचा एक म्हातारा ब्राह्मण रहात होता. वार्धक्यामुळें तो बहिरा झाला होता, सर्व प्रकारें दुबळा आणि असहाय झाला होता. त्याची पत्नीही तशीच म्हातारी आणि दुबळी होती. कांहीं दिवसांपूर्वी त्यांची पर्णकुटी जोराच्या वादळांत नष्ट झाली होती, तेव्हांपासून राजाच्या हुकुमानें याच

वाड्यांत तीं दोघें रहात होतीं. कुणी राजपुत्र येऊन या वाड्यांत रहाणार आहे असें ऐकून तीं दोघेंही वाडा सोडून जायला निघूं पहात होतीं, असें ऐकून हेमचन्द्राला फार वाईट वाटलें. एवढ्या मोठ्या वाड्यांत उभयतांचाही सहज समावेश झाला असता. ब्राह्मणाला उगीच गृहत्याग करायला कां लावायचें ?

हेमचन्द्र जनार्दनापाशीं गेला आणि त्यानें त्याला प्रणाम केला तेव्हां त्यानें विचारलें, " तूं कोण बाबा ? "

हेमचन्द्र म्हणाला, " मी आपला सेवक. "

" काय म्हणालास ? " जनार्दन म्हणाला, " सेवाग्रामहून आलास का ? "

हेमचन्द्राला कळून चुकलें म्हाताऱ्याला नीटसें ऐकूं येत नाहीं. तो मोठ्यानें ओरडून म्हणाला, " माझं नांव हेमचन्द्र, मी आहें ब्राह्मणांचा दास. "

" ठीक ठीक ! " जनार्दन म्हणाला, " आधीं नीटसं ऐकूं आलं नाहीं. तुझं नांव हनुमानदास तर ! "

इथें संभाषण करणें कठीण आहे अशी कल्पना करून नांवाचा प्रश्न सोडून देऊन हेमचन्द्र म्हणाला, " राजेसाहेबांनीं माझी इथं राहायची सोय केली आहे म्हणून तुम्ही हें स्थान सोडून जातां आहां असं ऐकलं. "

" नाहीं, नाहीं, " जनार्दन म्हणाला, " अजून माझं स्नान झालं नाहीं. आतां स्नानालाच जायच्या तयारींत होतों. "

हेमचन्द्र हताश झाला. आतां या ब्राह्मणाला कसें सांगावें याचा तो विचार करीत असतांना मागून कुणीतरी त्याचें उत्तरीय धरून ओढलें. हेमचन्द्रानें वळून पाहिलें—समोर एक मूर्तिमंत देवीची प्रतिमा उभी होती. ती सजीव होती—ती प्रतिमा नव्हती. विधात्याच्या निर्माणकौशल्याची पराकाष्ठा पावलेली ती एक पूर्णयौवना तरुणी होती. मोठ्या मधुर आवाजांत ती म्हणाली, " आजोबांना काय विचारतां आहां तुम्ही ? त्यांना नीट ऐकूं येत नाहीं. "

" तें आतां मला कळलंच. " हेमचन्द्र म्हणाला, " तूं कोण ? "

" मी मनोरमा. " ती बालिका म्हणाली, " तुम्ही आजोबांना काय विचारीत होतां ? "

हेमचन्द्र म्हणाला, " हें घर सोडून हे जात आहेत असं मी ऐकलं—त्यांना जाऊं नका म्हणून सांगायला मी आलों होतों. "

" या घरांत एक राजपुत्र येतो आहे. " मनोरमा म्हणाली, " तो आम्हांला कसं इथं राहायला देईल ? "

" मीच तो राजपुत्र. " हेमचन्द्र म्हणाला, " तुम्ही इथंच रहावं असा माझा आग्रह आहे. "

मनोरमेनें विचारलं, " कां ? "

याला काय उत्तर द्यायचें ? हेमचन्द्र दुसरें कांहीं उत्तर सुचत नाहीं हें पाहून म्हणाला, " कां म्हणजे काय ? समज, तुझा भाऊ इथं राहायला आला, तर तो तुम्हाला घालवून देईल का इथून ? "

" तूं भाऊ का माझा ? " मनोरमेनें विचारलें.

हेमचन्द्र म्हणाला, " कळलं ? "

" कळलं ! " मनोरमा म्हणाली, " पण धाकटी बहीण म्हणून तूं माझ्यावर सत्ता गाजवायचा नाहींस ना ? "

तिचें उत्तर ऐकून हेमचन्द्र गोंधळांत पडला. त्याला प्रश्न पडला, ही वेडी आहे कीं साधी सरळ आहे ! तो म्हणाला. " मी कशाला सत्ता गाजवीन ? "

" मी कांहीं चूक केली तर ? "

" चूक केली तर मला राग येणारच ! "

मनोरमा विरसल्यासारखी होऊन म्हणाली, " मला अजून कुणी भाऊ नव्हता—भावाला लाजलं पाहिजे का ? "

" छे छे मुळींच नाहीं ! "

" तर मग मी सुद्धां तुला लाजायची नाहीं !-खरंच ! पण तूं मला लाजणार का ? "

हेमचन्द्र हंसला आणि म्हणाला, " आधीं मला हें सांग, माझं म्हणणं तुझ्या आजोबांना पटवायचं कसं ? "

" मी सांगतें." असं म्हणून म्हाताऱ्याच्या कानाला लागून तिनें हेमचन्द्राचें म्हणणें त्याला अगदीं हलकेच सांगितलें. तिचें भाषण म्हाताऱ्याला कळलें हें पाहून हेमचन्द्राला आश्चर्य वाटलें.

ब्राह्मण खूष झाला आणि राजपुत्राला आशिर्वाद देऊन मनोरमेला म्हणाला, " मनोरमा, ब्राह्मणीला सांग, आजपासून राजपुत्र तुझा नातू झाला. त्याला

आशीर्वाद दे." असें म्हणून तो स्वतःच, 'ब्राह्मणी! ब्राह्मणी!' म्हणून हांक मारूं लागला.

ब्राह्मणी घरकामांत गुंतली होती. म्हाताऱ्याची हांक तिच्या कानीं गेली नाहीं. ब्राह्मण नाराज होऊन म्हणाला, "ब्राह्मणीचा हा मोठा दोष, कानानं जरा कमी ऐकूं येतं."

●●●

## —: ३ :—

हेमचन्द्र त्या राजवाड्यांत आरामांत राहिला होता. आणि मृणालिनी! निर्वासिता, परपीडिता, सहायहीना मृणालिनी कुठें होती?

संध्याकाळच्या आकाशांत तांबडे तांबडे मेघ सोनेरी रंग टाकून काळवंडून जात होते. नदीच्या पाण्यांत त्यांची सावली पडली होती. नदींतल्या छोट्या छोट्या लाटांचा माणसाच्या कुजबुजण्यासारखा आवाज होत होता. घाटावर होड्या लावून नावाडी आराम करायच्या तयारींत होते. त्यांतली छोटीशी एक होडी बाकीच्या होड्यांपासून वेगळी होऊन खाडीच्या तोंडापाशीं आली. होडीवाले जेवणाच्या तयारीला लागले. त्या छोट्या होडींत दोनच उतारू होते. त्या दोघीही बायका होत्या—मृणालिनी आणि गिरिजाया.

गिरिजाया मृणालिनीला म्हणाली, "आजचा दिवस तर गेला!" त्यावर मृणालिनी कांहीं बोलली नाहीं. तेव्हां गिरिजाया म्हणाली, "आजचा दिवस गेला—उद्यांचा दिवस जाईल—परवांचाही दिवस जाईल. रात्रंदिवस चिंता करीत कशाला बसायचं? इथं आलों तें फुकट असं वाटतं असेल, तर चला आपण परत जाऊं."

"कुठं जायचं?" मृणालिनीनें विचारलें.

"चला, हृषिकेशच्या घरीं जाऊं."

"त्यापेक्षां गंगेत जीव दिलेला काय वाईट!"

"तर मग मथुरेला जाऊं."

"मथुरेंत मला स्थान नाहीं." मृणालिनी म्हणाली, "कुलटेसारखी मी ऐन रात्रीं बापांचं घर टाकून निघालें ती आतां कुठल्या तोंडानं पुन्हा तिथं जाऊं? मी कांहींही सांगितलं तरी कोण ऐकून घेणार आहे माझं?"

" तर मग कुठं जायचं ? " गिरिजाया म्हणाली.

" इथंच राहायचं ! " मृणालिनी म्हणाली.

" हेंच ठरवलं होतं ना आपण ? " गिरिजाया म्हणाली, " प्रियजनाला भेटायला आली आहेस, मग अशी उदास कां झाली आहेस ? "

मृणालिनी म्हणाली, " हेमचन्द्र इथंच आहे, पण एक वर्षभर मला त्यांची भेट घेतां येणार नाहीं. आणि भेटलें तरी त्याला काय सांगायचं ? हृषिकेशा-बरोबर भांडून आलें म्हणून सांगायचं, कीं कुलटा म्हणून त्यानं मला घालवून दिलं म्हणून सांगायचं ? "

" मग इथं आलीस कशाला ? "

" त्यांची माझी भेट व्हायची नाहीं, पण त्यांना मी पाहीन. त्यांना पाहायलाच ना मी इथं आलें ? "

गिरिजाया तोंडभर हंसली. ती गाऊं लागली :—

**दारींच्या कण्हेरीला । फूल फुललें लाल लाल ।**
**कां रे दुर्जना मारूता । हालवुनी केले हाल ॥**

गिरिजाया म्हणाली, " त्यांना पाहून तुम्ही जीव धरून ठेवा—मी तुमची दासी होऊन आलें आहें. त्याला पाहून माझं तर पोट भरायचं नाहीं ? मी कशावर जगूं ? "

" मी तुला सांगतें, " मृणालिनी म्हणाली, " मला माळा गुंफतां येतात, चित्रं काढतां येतात, भरतकाम करतां येतं. तूं बाजारांत जाऊन माझे ते जिन्नस विकून पैसे कर. "

गिरिजाया म्हणाली, " गात गात बाजारांत गेलें तर चालेल का ?

गिरिजाया गाऊं लागली—

**चरणतलिं तुझ्या श्यामसुन्दरा ।**
**प्राणदान मम केलें चतुरा ॥**
**मोलाचें मम यौवन नूतन ।**
**दिधलें सारें एक प्राण धन ॥**

**मुद्दल गेलें तुझिया हातीं ।**
**व्याज तयाचें मागें प्रीती ॥**
**आणिक नाहीं कांहि मागणें ।**
**दिवा निशी मज दर्शन देणें ॥**
**प्रेमसागरीं लोटिलि तरणी ।**
**नावाडी परि तिला नाहिं कुणी ॥**

मृणालिनी म्हणाली, " मग पाण्यांत बुडून जीव कां दिला नाहींस ? "

गिरिजाया म्हणाली, " मरायची खंत आहे कुणाला ?—पण—"

मृणालिनी म्हणाली, " कुणा अप्रेमिकाचं गाणं हें गिरिजाया ? "

" असं कां म्हणतां ? " गिरिजाया म्हणाली.

" मी असतें तर होडीच बुडवली असती ! " मृणालिनी म्हणाली.

" अगदीं आपखुषीनं ? " गिरिजायेनं विचारलें.

" हो हो," मृणालिनी म्हणाली, " अगदीं राजीखुषीनं."

" तर मग तुम्हाला पाण्यांत असलेलं रत्न दिसलं खास !" गिरिजाया म्हणाली.

●●●

## —: ४ :—

हेमचन्द्र कांहीं दिवसपर्यंत त्या बागेंतल्या वाड्यांत राहिला होता. जनार्दनबरोबर रोज त्याची गांठभेट होत असे, पण तो ब्राह्मण बहिरा असल्यामुळें नुसतें खुणेनें बोलण्यावरच काम भागवावें लागे.

मनोरमाही त्याला वारंवार भेटत असे. केव्हां केव्हां ती त्याच्याबरोबर गोष्टी बोलत बसे, तर केव्हां केव्हां फारसें न बोलतां निघून जाई. मनोरमेचें वर्तन पाहून त्याला फार आश्चर्य वाटे. सकृत्दर्शनी पाहिली तर ती एकादी लहानशी बालिका असावी असें वाटे, तर केव्हां केव्हां ती कुणाही प्रौढेइतकी गंभीर असल्याची जाणीव होई. त्याला प्रश्न पडे, ती अजूनही कुमारीच असेल का ? एके दिवशीं बोलतां बोलतां हेमचन्द्रानें तिला विचारलें, " तुझं सासर कुठं आहे मनोरमा ? "

मनोरमा म्हणाली, " कांहीं सांगतां येत नाहीं ! "

असेंच एकदां त्यानें तिला विचारलें, “ तुला किती वर्षे झालीं मनोरमा ? ”

“ कांहीं सांगतां येत नाहीं ! ” असेंच तिनें उत्तर दिलें.

हेमचन्द्राला त्या वाड्यांत ठेवून माधवाचार्य देशपर्यटणाला गेले. गौड देशांतील बाकीच्या राजांनीं गौडेश्वराला अनुकूल होऊन सैन्य घेऊन नवद्वीपांत येण्यासाठीं त्यांचें मन वळवावें, असा त्यांचा उद्देश होता. हेमचन्द्र त्यांच्या परत येण्याची वाट पहात होता. कांहीं काम न करतां बसून रहाणें त्याला कठीण जात होतें. केव्हां केव्हां त्याला वाटे, दिग्विजयाला घर राखायला ठेवून एकदां गावांतून फिरून यावें, पण रस्त्यांत कुठें मृणालिनीची भेट झाली तर प्रतिज्ञाभंग होईल या भीतीनें तसें करायला त्याचें मग धजेना.

एकदां संध्याकाळच्या वेळीं हेमचन्द्र निसर्गाची शोभा पहात बसला होता. अकस्मात् खिडकीजवळ काळोख झाला—बाहेरून येत असलेलें चांदणें कुणाच्या तरी छायेमुळें दृष्टीआड झालें. त्यानें डोकावून पाहिलें, खिडकीपाशीं कुणातरी माणसाचें डोकें दिसलें. बाहेरच्या जमिनीपासून खिडकी बरीच उंचावर असल्यामुळें त्या व्यक्तीचें धड दिसलें नाहीं. तो माणूस दाढीमिशीवाला असावा. त्याच्या डोक्याला फेटा असावा.

हेमचन्द्र एकदम उडी मारून बिछान्यावरून उठला आणि त्यानें हातीं तलवार घेतली. वळून पहातो तों खिडकीपाशीं कुणीच नव्हतें.

हातीं तलवार घेऊन दार उघडून तो घराबाहेर पडला. खिडकीबाहेर येऊन पहातो तों तिथें कुणीच नव्हतें.

घराच्या चोंहीं बाजूला त्यानें धुंडाळून पाहिलें, नदीतीरीं पाहिलें, आजूबाजूच्या झाडींतून देखील त्यानें तपास केला, पण तिथें कुणीच नव्हतें.

हेमचन्द्र फिरून घरीं आला. बापानें दिलेला सैनिकवेष त्यानें अंगावर चढवला. अकालीं येणाऱ्या मेघासारखें हें संकट आल्याचें जाणवल्यामुळें तो अत्यंत अस्वस्थ झाला होता. त्या निस्तब्ध रात्रीं हातीं शस्त्र घेऊन तो जायला निघाला. खिडकींत माणसाचें डोकें दिसलें तेव्हांच त्याला कळून चुकलें, कीं वंग देशांत तुर्क आले.

● ● ●

-: ५ :-

राजपुत्र हेमचन्द्र तुर्काच्या शोधांत बाहेर पडला होता. एकादें मेंढरूं दिसल्याबरोबर वाघ जसा एकदम उडी घालतो तसाच तो तुर्काच्या शोधाला निघाला होता. जवळपास तुर्क न दिसल्यामुळें तो अस्वस्थ झाला होता. त्यानें पाहिला तो तुर्क जरी एकटाच होता, तरीही त्याला संशय आला, कीं नगराच्या आसपास कुठेंतरी तुर्की सेना आली असावी, त्यांतलाच तो टेहळ्या असावा.

त्या बागेंतल्या वाड्यापासून राजरस्ता बराच दूर होता. तिथून बाहेर पडण्याची वाट चिंचोळी होती. त्या वाटेच्या एका बाजूला एक मोठें तळें होतें. त्या तळयाच्या आजूबाजूला घनदाट फळाफुलांचीं झाडें होतीं. या तळयांत भुतें रहातात अशी लोकवार्ता होती, म्हणून सहसा गांवांतले कुणी लोक त्या बाजूला फिरकत नसत.

हेमचन्द्र त्या तळ्याच्या पायऱ्यांपाशीं आला. तो एकदम दचकला. भुताटकीची लोकवार्ता खरी असावी असें त्याला वाटलें. तळ्याच्या पायरीवर पाण्यांत पाय सोडून कुणींतरी स्वच्छ पांढरें वस्त्र नेसलेली स्त्री बसली होती. तें भूत असावें अशी शंका घेऊन तो दबत दबत तिच्याजवळ आला. त्याला वाटलें, ती मनुष्यच असली तर ? पण एवढ्या रात्रीं ती इथें कां ?

तो तुर्काच्या शोधाला आला होता. कदाचित या व्यक्तीनें त्या तुर्काला पाहिलें असेल अशी कल्पना करून तो तळयाच्या पायऱ्या उतरून खालीं गेला. तो येत असल्याचें पाहूनही ती व्यक्ती तिथून ढळली नाहीं. हेमचन्द्र अगदीं तिच्या जवळ आला तेव्हां ती उठून उभी राहिली. तिनें मागें वळून पाहिलें. तिनें मोकळे सोडलेले केंस आपल्या चेहऱ्यावरून मागें सारले तेव्हां हेमचन्द्राला तिचा चेहरा दिसला. ती भूत नव्हती, पण भूत असती तरीही त्याला इतकें आश्चर्य वाटलें नसतें.

त्यानें विचारलें, " कोण ? मनोरमा ! तूं यावेळीं इथं कुठं ? "

मनोरमा म्हणाली, " मी सदोदित येतें इथं. पण तुम्हीं इथं कां ? अन् हा असा वेष कां ? कुठल्या लढाईवर निघालां आहां ? अन् हीं हिरेमाणकं कां

तुमच्या अंगावर? कुणी चोर आले तर काढून नेतील ना? अन् या रात्रीं हे दागदागिने घालायची काय जरूरी? लग्नासाठीं का निघालां आहां?"

"तुला काय वाटतं मनोरमा?" हेमचन्द्रानें विचारलें.

"माणसांना मारायचीं शस्त्रं घेऊन कांहीं कुणी लग्नाला जात नाहीं." मनोरमा म्हणाली, "तुम्हीं लढायला निघालां आहां!"

"कुणाबरोबर लढणार मी?" हेमचन्द्रानें विचारलें, "अन् तूं इथं काय करीत होतीस यावेळीं?"

"मी स्नान करीत होतें. स्नान केल्यावर केस वाळवीत होतें. पहा ना, अजूनसुद्धां माझे केस ओले आहेत."

"हें बरं नव्हे," हेमचन्द्र म्हणाला, "तूं बायको माणूस, रात्रीच्या वेळीं अशा भयाण जागीं एकटं येणं बरं नव्हे! बरं,—इथून कुणी माणूस जातांना दिसला का तुला? होय? कसा होता त्याचा वेष?"

"तुर्कांचा वेष होता त्याचा." मनोरमा म्हणाली, "तुम्हीं तुर्कांच्याच शोधाला निघालां आहां का?"

"हो! कुठल्या रस्त्यानं गेला तो!"

"त्याची चौकशी तुम्हाला कशाला?"

"त्याचा जीव घ्यायचा आहे मला." हेमचन्द्र म्हणाला.

"माणसाचा जीव घ्यायचा कशाला?"

"सारे तुर्क माझे शत्रू आहेत. जिथं तुर्क सांपडेल तिथं मी त्याचा जीव घेणार."

"तर मग चला माझ्याबरोबर." मनोरमा म्हणाली, "सांभाळून या हं!"

हेमचन्द्र साशंक झाला. यवनाच्या युद्धाची वाट काय ही बालिका दाखवणार?

मनोरमेला त्याच्या संशयाचा अंदाज आला आणि ती म्हणाली, "मी एवढीशी मुलगी दिसतें म्हणून का तुम्हाला खात्री वाटत नाहीं?"

हेमचन्द्र तिच्याकडे नुसता पहात राहिला होता, तो अचंबित झाला होता. कोण ही मनोरमा?

●●●

-: ६ :-

गौडेश्वराचा धर्माधिकारी पशुपती म्हणजे एक असामान्य व्यक्ती होती. तोच होता खरा गौडेश्वर. राजा म्हातारा झाला होता, राजकार्य करण्याचें सामर्थ्य त्याच्याठायीं राहिलें नव्हतें, म्हणून सारा कारभार पशुपतीवर सोपवून तो स्वस्थ राहिला होता.

पशुपतीचें वय सुमारें पस्तिस वर्षांचें असावें. तो फार देखणा होता. त्याच्या तोडीचा विद्वान साऱ्या गौडदेशांत कुणी नव्हता असें लोक म्हणत. तो जसा विद्वान होता तसाच योद्धाही होता. पशुपती जातीनें ब्राह्मण होता. त्याचा जन्म कुठें झाला याचा कुणाला पत्ता नव्हता. त्याचा बाप एक शास्त्रव्यवसायी दरिद्री ब्राह्मण होता असें कुणी म्हणत. केवळ आपल्या बुद्धीच्या आणि विद्येच्या प्रभावानें त्यानें गौडराज्याचें प्रधानपद मिळवलें होतें.

तारुण्याच्या कालांत पशुपती काशींत आपल्या बापाजवळ शास्त्राभ्यास करीत होता. तिथें केशव नांवाचा एक बंगाली ब्राह्मण रहात असे. त्याची हैमवती नांवाची आठ वर्षांची मुलगी होती, तिच्याबरोबर पशुपतीचें लग्न झालें होतें. लग्नाच्या रात्रींच असा चमत्कार झाला, कीं पशुपतीच्या विवाहित वधूला घेऊन केशव कुठें नाहींसा झाला. पुष्कळ तपास केला तरी त्याचा पत्ता लागला नाहीं. त्यानंतर पशुपतीनें दुसरें लग्न केलें नाहीं. आज तो एका भव्य राजवाड्यांत रहात होता खरा, पण गृहिणीच्या अभावीं त्या नंदनवनाचें जंगल झालें होतें.

त्या दिवशीं पशुपती आपल्या वाड्याच्या एका एकांत खोलींत दिव्यापाशीं बसला होता. त्या खोलीच्या बाहेर मागल्या बाजूला आंबराई होती. त्या आंबराईतून बाहेर जाण्याचा एक गुप्त दरवाजा होता. रात्रीच्या वेळीं कुणीतरी त्या दरवाजावर हळुहळु टिचक्या मारल्या.

पशुपतीनें दार उघडलें तेव्हां एकजण आंत आला. तो मुसलमान होता. हेमचन्द्रानें आपल्या खिडकीपाशीं ज्याची सावली पाहिली होती तोच हा होता.

पशुपतीनें त्याला बसायला आसन दिलें. ओळखीची खूण त्यानें दाखवल्यावर पशुपतीनें बोलायला सुरवात केली.

पशुपती म्हणाला, " तुर्की सेनापतीच्या विश्वासांतले तुम्ही आहां हें मला

पटलं—अर्थात् माझाही तुमच्यावर विश्वास आहे. तुमचं नांव महमदअल्लीच ना ? ठीक ! आतां सेनापतीचं म्हणणं काय आहे तें मला सांगा."

यवन म्हणाला, "खिलजीसाहेबांचा अभिप्राय आपण जाणतांच. लढाई केल्याशिवाय गौडदेश काबीज करावा अशी त्याची इच्छा आहे. आपण आतां कोणत्या प्रकारें हें कार्य साधणार तेंच मला सांगा."

पशुपती म्हणाला, "हें राज्य दुसऱ्याच्या हातीं द्यावं कीं न द्यावं हें मी अजून ठरवलेलं नाहीं. स्वदेशाशीं द्रोह करणं महापाप आहे. काय म्हणून मी असं करावं ?"

"उत्तम !" यवन म्हणाला, "मी जातों तर. असंच जर होतं तर खिलजी-कडे दूत कां पाठवला ?

"युद्धाची आवड खिलजींना किती आहे तें पाहण्यासाठीं !" पशुपती म्हणाला.

तें ऐकून महमदअली जायला निघाला, तेव्हां पशुपती म्हणाला, "जरा थांबा. मला आणखी कांहीं सांगायचं आहे. यवनांच्या हातीं हें राज्य सुपुर्द करायला माझी ना नाहीं—तें अशक्यही नाहीं ! गौडदेशाचा राजा आहें मी—सेन राजा नुसता नामधारी. पण त्याचा पुरेसा मोबदला मला मिळाला नाहीं तर मी काय म्हणून हें राज्य तुम्हाला द्यावं ?"

"आपल्याला काय हवं आहे ?"

"खिलजी काय देईल ?"

"जें आपलं आहे तें आपल्याकडेच राहील." यवन म्हणाला, "आपला दर्जा, आपलं ऐश्वर्य, आपला अधिकार जसा आहे तसाच राहील."

"तर मग यांत माझा विशेष फायदा तो काय ?" पशुपती म्हणाला, "कोणत्या आशेनं मी हें पाप करायला तयार होऊं ?"

"आम्हाला अनुकूल झालां नाहीं तर हें सारं हरवून बसाल." यवन म्हणाला.

"लढाईच्या निकालावरच तें अवलंबून राहील." पशुपती म्हणाला, "आम्ही लढाईच्या तयारींत नाहीं असं समजूं नका. मगधदेशांत बंड सुरू होत आहे—खिलजीला तें आधीं मिटवावं लागेल. अर्थात सध्यां त्याला गौड-

देशावर चाल करून येणं शक्य होणार नाहीं. लढाईच करायची तर ही संधी उत्तम आहे. बिहारदेशानं बंड पुकारलं कीं गौडदेशही त्यांना सामील होईल."

" त्यांत काय बिघडेल ?" यवन म्हणाला, " मुंगी चावल्यानंतर जर चिलट चावलं तरी हत्ती कांहीं मरत नाहीं. तें राहूं द्या. तुम्हाला याचं बक्षिस काय हवं आहे तें आधीं सांगा."

" ऐका तर !" पशुपती म्हणाला, " सध्यां मी गौडदेशचा राजा असलों तरी लोक कांही मला गौडेश्वर म्हणत नाहींत. मला गौडेश्वर व्हायचं आहे— सेनवंश नष्ट करून गौडेश्वर व्हायचं आहे."

" त्यांत आमचा काय फायदा ?" यवन म्हणाला, " तुम्ही आम्हाला काय द्याल ?"

" आम्ही तुम्हाला खंडणी देऊं." पशुपती म्हणाला, " खिलजीचे मांडलीक म्हणून राहूं. मी स्पष्ट करून सांगतों — सेनराजा आमचा प्रभू आहे. तो वयानं वृद्ध आहे. माझ्यावर त्याचा लोभ आहे. अशा वेळीं त्याला मी माझ्या बळाच्या जोरावर राज्यभ्रष्ट केला तर लोकांत माझी निंदा होईल. लढाई केल्याशिवाय तुम्ही हें राज्य काबीज केलं आणि त्याला गादीवरून काढून मला त्या गादीवर बसवलं, तर स्वतः मी दोषी ठरणार नाहीं. युद्धाला आम्ही तयार आहों. कदाचित् आमचा जय होईल, क्वचित् पराजय होईल. पराजय झाला तर सर्वस्वाची हानी होईल म्हणूनच खिलजीशीं संगनमत करायची माझी तयारी आहे. मग त्या गादीवर बसणं मला कठीण जाणार नाहीं."

" आपलं म्हणणं मला पूर्णपणें पटतंय." यवन म्हणाला, " आपलं हें सारं निवेदन मी खिलजीसाहेबांपुढें मांडीन. सारं हिंदुस्तान यवनराज्य व्हावं अशी आमची महत्वाकांक्षा आहे. तरीपण आपल्याला आम्ही गौडदेशाचे अधिपती करूं. दिल्लीला महंमद घोरीचा प्रतिनिधी म्हणून कुतुबुद्दीन कारभार करतो आहे, त्याचप्रमाणें आपण गौडदेशचे प्रतिनिधी व्हाल. हें कबूल आहे का आपल्याला. ?"

" या प्रस्तावाला माझी सम्मती आहे." पशुपती म्हणाला.

"ठीक आहे." यवन म्हणाला, " पण आपण जी ही कबुली दिली आहे ती अमलांत आणणं तुम्हांला शक्य आहे का ?"

पशुपती म्हणाला, " माझ्या हुकुमाशिवाय एकादा पायदळ सैनिक देखील शस्त्र हातीं घेणार नाहीं. राज्याचा खजिना माझ्या माणसाच्याच हातीं आहे. माझ्या हुकुमाखेरीज लढाईच्या खर्चासाठीं एक कवडीही मिळणार नाहीं. पांच अनुचर घेऊन खिलजी या राजधानींत आला, तर ' तुम्ही कोण ' म्हणून त्यांना कुणीसुद्धां विचारणार नाहीं. "

" आणखी एक गोष्ट विचारायची आहे. यवनांचा मोठा दुष्मन हेमचन्द्र सध्यां या शहरांत आहे. आजच्याच रात्रीं त्याचं मुंडकं यवनाच्या शिबिरांत पोचतं झालं पाहिजे. "

" आपणच येऊन त्याचं मुंडकं छाटा. " पशुपती म्हणाला, " शरणागताच्या हत्येचं पाप आम्ही कां करावं ? "

" तें काम आमच्याकरवीं व्हायचं नाहीं. " यवन म्हणाला, " यवनाशीं संधी झाला आहे असं कळतांच तो या नगरांतून पळून जाईल. आज तो निश्चिन्त आहे. आजच्या आज माणूस पाठवून त्याचं मुंडकं छाटा. "

" ठीक आहे. " पशुपती म्हणाला, " हेंही काम करायची मी कबुली देतों. "

" आमचं समाधान झालं. " यवन म्हणाला.

" आतां एकच गोष्ट विचारायची आहे. " पशुपती म्हणाला, " हें राज्य मी आपल्या हवाली केलं अन् त्यानंतर तुम्ही जर मलाच हाकलून लावलं तर ? "

यवन म्हणाला, " तुमच्यावर विश्वास ठेवून आम्ही थोडेसे शिपायी घेऊन या नगरांत प्रवेश करणार. कबूल केल्याप्रमाणें आम्हीं जर वागलों नाहीं तर आम्हाला हांकलून देणं तुम्हाला कठीण जायचं नाहीं. "

पशुपती म्हणाला, " अन् तुम्ही जर थोडेसे शिपायी न घेतां मोठं सैन्य घेऊन आलां तर ? "

" तर मग तुम्ही आमच्याशीं लढाई करा. " यवन म्हणाला. एवढेंच बोलून त्यानें पशुपतीचा निरोप घेतला.'

●●●

## —: ७ :—

महमदअली निघून गेल्यावर थोड्यावेळानें एकजण त्या चोरदारापाशीं आला आणि म्हणाला, " आंत येऊं का ? "

पशुपतीनें ' ये ' म्हणतांच आंत येऊन तो पशुपतीला प्रणाम करून समोर उभा राहिला. पशुपतीनें विचारलें, " कसं काय शांतशील, खबर काय आहे ?"

शांतशील म्हणाला, " आपण एक एक प्रश्न करावा— मी त्याचीं तपशीलवार उत्तरं देतों. "

" यवनांच्या छावणीकडे गेला होतास ? "

" तिथं जाणं फार कठीण आहे. तें घनदाट जंगल आहे. त्यांतून रस्ता काढणं सुद्धां दुष्कर आहे. आंत वाघ लांडग्यांसारखीं भयानक जनावरं आहेत."

" मग शस्त्र घेऊन कां गेला नाहींस ? "

" इथले कांहीं शिकारी लोक वाघाला मारायला गेले होते ते यवनांच्या हातून मारले गेले. त्यांतला एकही माणूस परत आला नाहीं. माझीही तीच दशा झाली असती तर ही बातमी द्यायला मी इथं कसा येणार होतों ? "

" आतां आलास ना ? कसा गेला होतास तिकडे ? "

" कसा गेलों तें सांगतों,. " शांतशील म्हणाला, " आधीं मी यवनांचा पोषाख अन् हत्यारं मिळवलीं, त्यांची मोटली पाठीवर बांधून शिकारी लोकां-बरोबर जंगलांत गेलों, यवनलोक शिकारी लोकांना मारायला येत आहेत असें पाहून झाडाआड लपून मी वेष बदलला अन् शेवटीं त्यांच्यांतच मिसळून त्यांच्या छावणींत जाऊन आलों. "

" शाबास ! " पशुपती म्हणाला, " किती आहे त्यांचं सैन्य ? "

" साऱ्या जंगलभर आहे त्यांचं सैन्य. " शांतशील म्हणाला, " बहुधा पंचवीस हजार होईल. "

पशुपतीनें कपाळाला आंठ्या घातल्या. क्षणभर विचार करून तो म्हणाला, " त्यांची कांहीं चर्चा तुला ऐकायला मिळाली का ? "

" पुष्कळच ऐकलं. " तो म्हणाला, " पण त्यांची भाषा मला येत नसल्या-मुळं आपल्याजवळ सांगण्यासारखं मजपाशीं कांहीं नाहीं. "

त्याचें भाषण ऐकून पशुपती हंसला तेव्हां शांतशील म्हणाला, " महम्मदअली इथं आला आहे—त्याअर्थीं कांहींतरी संकट येणार खास ! तो कांहीं अगदींच लपून छपून आला नाहीं. कुणीना कुणीतरी त्याला पाहिलंय खास !—"

" असं कां वाटलं तुला ? "

" मी इथं आपल्याला भेटायला येत असतांना झाडाखालीं एकजण छपून राहिलेला मला दिसला. तो लढवय्याच्या वेषांत होता. त्याच्याबरोबर मी थोडासा बोललों, त्यावरून मला कळून आलं, कीं त्यानं महमदअलीला इथं आलेला पाहिला. तो परत जायची वाट तो माणूस पहात होता. कांळोखांत मला त्याची ओळख पटली नाहीं. "

" मग तूं काय केलंस ! "

" मी त्याला कोठडींत कोंडून ठेवलं आहे. " शांतशील म्हणाला.

" उद्यां सकाळीं आपण त्याचा काय तो विचार करूं. आजची रात्र तो कोठडींतच राहूं दे. " पशुपती म्हणाला.

क्षणभर थांबून पशुपती शांतशीलला म्हणाला, " आतां तुला दुसरं एक काम केलं पाहिजे. आजच्याच रात्रीं मगध राजपुत्राचं मुंडकं छाटून आणलं पाहिजे अशी यवन सेनापतीनं इच्छा प्रकट केली आहे. तें काम आधीं केलं पाहिजे. "

" तें काम कांहीं इतकं सोपं नाहीं, " शांतशील म्हणाला, " राजपुत्र म्हणजे कांहीं कीड मुंगी नव्हे. "

" मी कांहीं तुला एकट्याला जा म्हणत नाहीं, " पशुपती म्हणाला, " बरोबर हवीं तेवढीं माणसं घेऊन जा आणि बागेंतल्या वाड्यावर छापा घाल. "

" लोक काय म्हणतील ? " शांतशील म्हणाला.

पशुपतीनें उत्तर दिलें, " लोक म्हणतील कीं दरवडेखोरांनीं त्याला मारलं ! "

" जशी आज्ञा ! " शांतशील म्हणाला, " मी निघालों. "

शांतशीलला बक्षिस देऊन पशुपतीनें निरोप दिला. नंतर तो घरांत गेला. उत्तम खोदकाम केलेल्या मंदिरांत अष्टभुजा देवीची मूर्ती स्थापन केलेली होती. तिच्यासमोर साष्टांग नमस्कार घालून नंतर उभा राहून तो हात जोडून म्हणाला, " माते, अफाट समुद्रांत मी उडी घेतली आहे. माझं रक्षण कर. जननीस्वरूपा जन्मभूमी मी केव्हांही देवद्वेषी यवनांना घेऊं देणार नाहीं. माझं पाप असेल तर तें एवढंच, कीं दुबळ्या झालेल्या म्हाताऱ्या राजाच्या जागीं मी राजा होणार आहें. कांट्यानं कांटा काढण्यासाठीं यवनांना मी हातीं घेत आहें. पहिला कांटा निघाला कीं हा दुसरा कांटा मी फेंकून देईन—यवनांचाही निःपात

करीन.—यावज्जीव प्रजेच्या सुखाची काळजी वाहून या पापाचं प्रायश्चित्त करीन." असें म्हणून त्यानें पुन्हां साष्टांग नमस्कार घातला.

तो उठून उभा राहिला आणि शेजघराकडे जायला निघाला—पण लगेच दचकला. दार आडवून एक तरुणी उभी होती. तो शहारला, पण लगेच त्याच्या मुद्रेवर आनंदाची छटा झळकली.

ती तरुणी अत्यंत मधुर वाणीनें म्हणाली, "पशुपती!"

पशुपतीला दिसून आलें—ती मनोरमा होती.

●●●

## —: ८ :—

डोळ्यांत जीव आणून पशुपती तिच्याकडे पहात होताता. पहातां पहातां मनोरमेच्या सौंदर्यसागराला अपूर्व भरतें आल्याचें त्याला जाणवलें. आतां ती मुग्ध बालिका राहिली नव्हती. प्रौढ वयाचें गांभीर्य तिच्या मुद्रेवर विराजमान झालें होतें. सरलतेला झांकून प्रतिभा उगवली होती.

पशुपती म्हणाला, "एवढ्या रात्रीं कां आलीस मनोरमा?—हें काय? आज तूं अशी कां दिसतेस?"

"असा काय बदल दिसला माझ्यांत?" मनोरमेनें विचारलें.

"दोन रूपं आहेत तुझीं!" पशुपती म्हणाला, "एक रूप—आनंदमयी सरला बालिका—त्या रूपानं कां आली नाहींस? तें तुझं रूप पाहिलं कीं माझं हृदय शीतल होतं. अन् हें दुसरं रूप—गंभीर, तेजस्वी, प्रतिभावान्, प्रखर-बुद्धीची प्रौढा—हें तुझं रूप पाहिलं कीं मी घाबरून जातों. असं वाटतं, कांहींतरी अचाट प्रतिज्ञा करून तूं आली असावीस! या स्वरूपांत येऊन तूं कां मला घाबरवून सोडते आहेस?"

मनोरमा म्हणाली, "पशुपती, एवढी रात्र जागून तुम्ही काय करीत होतां?"

"मी राजकार्यांत गुंतलों होतों." पशुपती म्हणाला, "पण तूं—"

"पुन्हा तेंच?" मनोरमा म्हणाला, "राज कार्य कीं निज कार्य?"

"निज कार्य म्हण हवं तर!" पशुपती म्हणाला, "राजकार्य असो कीं निजकार्य असो, मी गुंतलेला नसतों केव्हां? आजच कां विचारते आहेस हें?"

" मी सारं कांहीं ऐकलं ! " मनोरमा म्हणाली.

" काय ऐकलंस ? "

" यवनाबरोबर झालेलं पशुपतीचं खलबत—शांतशील बरोबर केलेलं कारस्थान— दाराच्या आड राहून मी सारं कांहीं ऐकलं ! "

पशुपतीचा चेहरा एकदम काळवंडला. क्षणभर थांबून तो म्हणाला, " बरं झालं ! मी तुला सारं कांहीं सांगणारच होतों—तें तूं आधींच ऐकलंस—बरं झालं ! तुला माहीत नाहीं असं काय आहे ? "

" तुम्ही माझा त्याग केला का पशुपती ? " मनोरमा म्हणाली.

" असं कां म्हणतेस मनोरमा ? " पशुपती म्हणाला, " तुझासाठींच तर माझी हीं सारीं कारस्थानं. आज मी आहें राजाचा सेवक, मला वाटेल तसं कांहींच करतां येत नाहीं. विधवेशीं लग्न केलं तर लोक मला वाळींत टाकतील ! पण मी राजा होईन तेव्हां कुणाची छाती होईल मला वाळींत टाकायची ? बल्लाळ-सेन राजानं कुलीन ब्राह्मणांची जशी नवीन पद्धत प्रचलित केली, तशी विधवा-विवाहाची नवी प्रथा मीही सुरू करीन. "

एक मोठा सुस्कारा सोडून मनोरमा म्हणाली, " हें एक माझं स्वप्न होतं. तुम्ही राजे झालांत तर तें स्वप्न भंग पावेल. मी केव्हांही तुमची राणी होणार नाहीं. "

" असं कां म्हणतेस मनोरमा ? " पशुपतीनें विचारलें.

मनोरमा म्हणाली, " राज्याचा भार तुम्ही पत्करला, कीं माझ्यावर प्रेम करणार कसं ? तुमचं सारं लक्ष गुंतून राहील राज्यकारभारावर. मग माझी कशी कदर होणार ?—अन् तुमचं प्रेम मिळत नसलं तर तुमची पत्नी होण्याच्या बंधनांत मी कां स्वतःला अडकवून घेऊं ? "

" असं कां वाटलं तुला ? " पशुपती म्हणाला, " आधीं तूं—मग राज्य—यांत केव्हांही बदल व्हायचा नाहीं. "

" राज्यापेक्षां राणीवरच मन गुंतवून राहिलां तर राज्य चालणार कसं ? " मनोरमा म्हणाली, " अशानं राज्य घालवून बसाल ! स्त्रैण राजाचं राज्य टिकत नाहीं. "

तिचे ते उद्गार ऐकून पशुपतीचें हृदय भरून आलें. तो म्हणाला, " ज्याच्या

शेजारीं अशी तुझ्यासारखी सरस्वती, त्याला भीती कशाची ? ठीक आहे—होऊन जाऊंदे—तुझ्यासाठीं मी राज्याचा त्याग करीन. ”

“ तर मग राज्य मिळवतां आहां तरी कशाला ? ” मनोरमेनें विचारलें, “ त्यागासाठीं ग्रहण करण्यांत लाभ काय ? ”

“ तुझं पाणिग्रहण ! ” पशुपती म्हणाला.

“ ती आशा सोडून द्या. ” मनोरमा म्हणाली, “ तुम्ही राजे झालांत तर मी तुमची पत्नी होणार नाहीं. ”

“ असं कां म्हणतेस मनोरमा ? ” पशुपती म्हणाला, “ माझा काय अपराध यांत ? ”

“ तुम्ही विश्वासघातकी आहां ! ” मनोरमा म्हणाली, “ विश्वासघातकी माणसावर माझी कशी भक्ती जडेल ? विश्वासघातक्यावर मी प्रेम कसं करूं ? ”

“ मी विश्वासघातकी कसा ? ” पशुपतीनें विचारलें.

मनोरमा म्हणाली, “ आपल्या प्रतिपालक धन्याला तुम्ही गादीवरून उखडून काढायचं कारस्थान करतां आहां, शरणागत राजपुत्राला मारायचा घाट घालतांहां, हा विश्वासघात नव्हे का ? धन्याशीं जो बेइमान झाला, तो स्त्रीशींही बेइमान होणार नाहीं कशावरून ? ”

यावर पशुपती कांहीं बोलला नाहीं. मनोरमा पुढें म्हणाली, “ मी तुम्हाला विनवून सांगतें, ही दुर्बुद्धी सोडून द्या. ”

पशुपती तसाच मान खालीं घालून राहिला होता. राज्याच्या अभिलाषे-प्रमाणेंच मनोरमेचा लाभ करून घेण्याची त्याची इच्छा बलवत्तर होती. राज्यलाभाचा प्रयत्न करावा तर मनोरमा हातची जाते ! या दोन्ही पेंचांतून सुटण्याची युक्ती त्याला सुचेना. मनोरमा मिळत असली तर भीक मागून संसार करायचीही त्याची तयारी होती, पण राज्यलोभ त्याला सुटत नव्हता.

तो कांहीं बोलत नाहीं असें पाहून मनोरमा म्हणाली, “ ऐका पशुपती—तुम्ही माझ्या प्रश्नाचं उत्तर दिलं नाहीं. आतां माझी प्रतिज्ञा ऐका—विश्वास-घातकी माणसाचं मी यापुढं तोंडही पहाणार नाहीं. मी चाललें. ” असें म्हणून ती जायला निघाली. त्यासरशीं पशुपतीला रडें कोसळलें.

मनोरमा पुन्हा मागें परतली. तिनें येऊन पशुपतीचा हात धरला. पशुपती

तिच्या तोंडाकडे पाहूं लागला. आतां ती तेजस्वी आणि प्रतिभाशाली मनोरमा अंतर्धान पावली होती. एक सुकुमार बालिका त्याचा हात धरून आसवें गाळीत होती.

" रडतां आहां कां ? " मनोरमेनें विचारलें.

" तुझ्या उद्गारांमुळं ! " पशुपती डोळे पुसून म्हणाला.

" कां ? असं मी काय बोललें ? " मनोरमा म्हणाली.

" तूं मला टाकून चालली आहेस ! "

" आतां मी असं कांहीं बोलणार नाहीं." मनोरमा म्हणाली.

" तूं माझी राणी होशील ? " पशुपतीनें विचारलें.

" होईन ! " मनोरमा म्हणाली.

पशुपतीच्या आनंदसागराला मोठें भरतें आलें. दोघेंही आसवें आलेल्या डोळ्यांनीं एकमेकांकडे पहात होतीं.

एकाएकीं मनोरमा उडत्या पाखरासारखी भुर्कन् निघून गेली.

●●●

## —: ९ :—

तलावाच्या कांठावरून हेमचन्द्र मनोरमेबरोबर यवनांचा शोध करण्यासाठीं निघाल्याचें पूर्वी सांगितलेंच होतें. पशुपतीच्या घराजवळ थोड्या अंतरावर आल्यावर मनोरमा हेमचन्द्राला म्हणाली, " हा समोर वाडा दिसतो आहे ना, याच वाड्यांत यवन गेला."

" कां गेला आहे तो तिथं ? " हेमचन्द्रानें विचारलें.

त्या प्रश्नाचें सरळ सरळ उत्तर न देतां मनोरमा म्हणाली, " तुम्ही या इथल्या झाडाच्या आड लपून रहा. तो यवन याच वाटेनं परत जाईल."

" तूं कुठं जाते आहेस ? " हेमचन्द्रानें विचारलें.

" मी याच वाड्यांत जातें आहें." मनोरमा म्हणाली.

हेमचन्द्रानें कबुली दिली. मनोरमेचें आचरण पाहून त्याला आश्चर्य वाटलें होतें, तरीही तो तिच्या सांगण्याप्रमाणें झाडाआड छपून बसला. मनोरमा चोर

दारानें घरांत गेली. याचवेळीं शांतशील पशुपतीच्या घरांत जायला आला होता. एक माणूस झाडाआड राहिल्याचें त्याला दिसून आलें. साशंक होऊन तो त्या झाडापाशीं गेला. हेमचन्द्राला तिथें पाहून तो चोर असावा असा अंदाज करून त्यानें विचारलें, " कोण तूं ? काय करतो आहेस इथं ?—" हेमचन्द्राच्या अंगावरचा लढवय्याचा पोषाख पाहून तो म्हणाला, " कोण आपण ? "

" मी कुणी का असेना—तुम्हाला काय करायचं आहे त्याच्याशीं ? " हेमचन्द्र म्हणाला.

" आपण काय करतां आहां इथं ?" शांतशीलनें विचारलें.

हेमचन्द्र म्हणाला, " मी यवनाचा शोध करतों आहें. "

शांतशील दचकला. त्यानें विचारलें, " कुठं आहे यवन ? "

" या समोरच्या वाड्यांत शिरला आहे." हेमचन्द्र म्हणाला.

घाबरल्याचा आव आणून शांतशील म्हणाला, " या वाड्यांत का शिरला आहे तो ? कुणाचा वाडा हा ? "

" तें मला माहीत नाहीं. "

" तर मग तो यवन याच वाडयांत शिरला आहे हें कसं कळलं तुम्हांला ? "

" त्याची उठाठेव तुम्हाला कशाला ? " हेमचन्द्र म्हणाला.

" हा वाडा माझा आहे. " शांतशील म्हणाला, " खरोखरच तो यवन जर या वाड्यांत शिरला असेल तर धोक्याचा प्रसंग आहे. आपण लढवय्ये दिसतां—यवनद्वेषी दिसतां—पटत असलं तर माझ्याबरोबर चला, आपण दोघेही त्या चोराला पकडूं."

हेमचन्द्र शांतशीलबरोबर निघाला. सदर दरवाजानें वाड्यांत प्रवेश करून तो हेमचन्द्राला एका खोलींत घेऊन गेला. तो म्हणाला, " माझं सारं जडजवाहिर या खोलींत आहे. आपण इथं सावधपणें राहा. यवन कुठं लपला आहे त्याचा तपास करून मी येतों. " एवढेंच बोलून शांतशील खोलीबाहेर गेला.

हेमचन्द्र पुढें कांहीं बोलण्याच्या पूर्वीच त्यानें बाहेरून दरवाजा बंद करून घेतला. हेमचन्द्र फशी पडला—कैदी झाला.

● ● ●

## -: १० :-

पशुपतीचा निरोप घेऊन मनोरमा घाईघाईनें चित्रगृहांत आली. पशुपतीबरोबर शांतशीलचें जें भाषण झालें त्यावरून हेमचन्द्र याच खोलींत अडकून पडल्याचें तिला कळून आलें होतें. तिनें त्या खोलीचें दार उघडलें. ती हेमचन्द्राला म्हणाली, " आतां बाहेर या पाहूं ! "

हेमचन्द्राला घेऊन मनोरमा बाहेर आली त्यावेळीं त्यानें तिला विचारलें, " मला कां कोंडून ठेवलं होतं ? "

" तें मग सांगेन. " मनोरमा म्हणाली.

" मला कोंडून टाकलं तो माणूस कोण ? "

" तो शांतशील. " मनोरमा म्हणाली, " तो एक गुप्तहेर आहे. "

" हा त्याचाच वाडा का ? "

" नाहीं ! "

" तर मग हा कुणाचा वाडा ? "

" तेंही मगच सांगेन. "

" यवन कुठं गेला ? " हेमचन्द्रानें विचारलें.

" तो आपल्या छावणींत गेला. "

" किती यवन आहेत तिथं ? कुठं आहे त्यांची छावणी ? " हेमचन्द्रानें विचारलें.

" पंचवीस हजार सैन्य आहे त्यांचं. " मनोरमा म्हणाली, " या नगरीच्या उत्तरेला एका जंगलांत त्यांनीं छावणी ठोकली आहे. "

हेमचन्द्र विचारांत पडला असें पाहून मनोरमा म्हणाली, " विचार कसला करतां ? लढाई करणार आहां का त्यांच्याबरोबर ? "

हेमचन्द्र म्हणाला, " पंचवीस हजारांना मी एकटा तोंड कसं देणार ? "

" तर मग काय करणार ? " मनोरमा म्हणाली, " घरीं परत जाणार ? "

" यावेळीं तरी घरीं परत जाणार नाहीं. मी त्या छावणीकडेसच जाणार आहें. "

" लढाई करणार नाहीं तर मग छावणीकडे कशाला जाणार आहां ? "

" एकदां यवनांना पाहून घेणार आहें. " हेमचन्द्र म्हणाला, " एकदां तो अंदाज आला म्हणजे पुढं काय करायचं, कसं त्यांना कापून काढायचं तें ठरवतां येईल मला. पण ही बातमी तूं कुठून मिळवलीस मनोरमा ? "

" आणखी एक बातमी आहे. " मनोरमा म्हणाली, " आजरात्रीं तुम्हाला मारायला मारेकरी येणार आहेत तुमच्या घरांत ! आज घरीं जाऊं नका. "

एवढेंच बोलून मनोरमा तडक पळत सुटली.

● ● ●

## —: ११ :—

हेमचन्द्र पुन्हा आपल्या वाड्यांत आला. घोड्यावर स्वार होऊन तो यवनांची छावणी असलेल्या जंगलाकडे निघाला. तो शहराबाहेर आला. त्याच्या पलीकडेच एक पठार होतें. त्या पठाराचा कांहींसा भाग ओलांडून तो गेला, तोंच त्याच्या खांद्याला कसलें तरी शस्त्र लागल्याचा त्याला भास झाला. एक तीर त्याच्या खांद्यांत घुसला होता. त्याच्या मागोमाग घोड्याच्या टापांचा आवाज ऐकूं आला. त्यानें मागें वळून पाहिलें. तीन घोडेस्वार त्याचा पाठलाग करीत येत होते. घोड्याचें तोंड मागें वळवून त्या स्वारांना तोंड देण्याच्या तयारीनें तो सरसावून राहिला. एकेक स्वार त्याच्यावर नेम धरून एकेक बाण सोडीत होता असें त्याला दिसून आलें. हातांतल्या भाल्यानें त्यानें मोठ्या कौशल्यानें अंगावर आलेले ते तीनही बाण तोडून टाकले.

त्या स्वारांनीं पुन्हा त्याच्यावर तीर सोडले आणि हेमचन्द्रानें ते पुन्हा तसेच तोडून काढले.

अशा रीतीनें ते स्वार त्याच्यावर सारखे बाण सोडीत होते. हेमचन्द्रानें पाठीवरची ढाल पुढें केली आणि ते बाण ढालीवर झेलायला सुरवात केली. त्याला स्वतःला एकही बाण लागला नाहीं पण त्याच्या घोड्याला मात्र एकदोन बाण लागले असावे.

ते पाहून त्या स्वारांनीं बाण सोडणें बंद केलें. ते आपसांत बोलत होते अशी संधी पाहून हेमचन्द्रानें धनुष्य सरसावून त्यांतल्या एकावर एक बाण सोडला. तो नेम अचुक लागला. घोड्याच्या पाठीवरून तो स्वार कोसळून जमिनीवर पडला.

आपला जोडीदार पडलेला पाहातांच त्या दोघां स्वारांनीं भाले सरसावून हेमचन्द्रावर चाल केली. त्यांनीं आपल्या हातांतला भाला फेंकला, पण तो हेमचन्द्रावर नेम धरून नव्हे, त्यांनीं हेमचन्द्रावर भाला रोंखला असता तर त्यानें आपल्या हातांतल्या भाल्यानें तो तोडून टाकला असता, पण त्यांनीं भाला मारला तो त्याच्या घोड्यावर. घोड्याच्या मानेंतच भाला बसल्यामुळें तें उमदें जनावर एकदम खालीं पडलें. तो पडत असतांनाच हेमचन्द्रानें अनुसंधान राखून एकदम त्याच्यावरून खालीं उडी मारली आणि हातांतला भाला सरसावून तो म्हणाला, " माझा हा पितृदत्त भाला शत्रूचं रक्त प्यायल्याशिवाय कधीं मागं फिरलाच नाहीं ! " असें तो म्हणत असतांनाच त्या भाल्यानें दुसऱ्य स्वाराला पहातां पहातां त्यानें खालीं पाडलें.

आपले दोन जोडीदार पडलेले पाहून तिसरा स्वार घोड्याचें तोंड फिरवून पळत सुटला. तो होता शांतशील.

ते गेलेले पाहतांच हेमचन्द्रानें खांद्यांत घुसलेला बाण ओढून काढला. तो बराच खोल गेला होता. बाण निघतांच रक्ताची धार सुरू झाली. अंगावरच्या वस्त्रांनीं तो ती जखम बांधायचा प्रयत्न करूं लागला पण त्याचा कांहीं उपयोग झाला नाहीं. रक्ताचा प्रवाह थांबत नव्हता.

हेमचन्द्र थकून गेला. आतां यवनांच्या छावणीपर्यंत पोंचणें शक्य नव्हतें हें त्याला कळून चुकलें होतें. घोडा मरून पडलेला, स्वतःच्या देहांत त्राण नाहीं—हताश होऊन तो पुन्हा शहराकडे जाण्यासाठीं मागें फिरला.

पठार ओलांडून हेमचन्द्र शहराच्या वेशीपाशीं आला त्यावेळीं तो अगदीं थकून गेला होता. त्याचें सर्वांग रक्तानें भरून गेलें होतें. आतां पुढें पाऊल टाकणें त्याला कठीण जात होतें.

मोठ्या कष्टानें त्यानें नगरांत प्रवेश केला. पुढें जाणें त्याला अशक्य झालें. एका झोंपडीच्या शेजारीं असलेल्या वडाच्या झाडाखालीं त्यानें बैठक मारली.

रात्र संपून पहाट होऊं लागली होती. साऱ्या रात्रीचें जागरण—रात्रभर केलेले परिश्रम—क्षुधाभावामुळें हातपाय पेंगुळलेले—हेमचन्द्राच्या डोळ्या-समोर सारी पृथ्वी गरगर फिरूं लागली, त्यानें वडाच्या झाडाला पाठ टेकली. त्याचे डोळे मिटले गेले—डोळ्यावर झांपड आली—हळुहळु त्याची संज्ञा नष्ट झाली.

त्या झोपडींत त्याला स्वप्न पडत होतें—कुणीतरी गात होतें—

**विधि-कंटकिता मृणाल पाण्यावरती ।**
**आशेनें डुंबत होती ॥**



# तृतीय खंड

## —: १ :—

ज्या झोंपडीच्या जवळच्या वडाच्या झाडाखालीं हेमचन्द्र पडला होता त्या झोंपडींत एक मजूर रहात होता. त्या झोंपडींत तीन खोल्या होत्या. त्यांतल्या एका खोलींत सैंपाकघर होतें. दुसऱ्या खोलींत त्या मजुराची बायको आपलीं मुलेंबाळें घेऊन झोंपत असे. तिसऱ्या खोलींत त्याची मुलगी रत्नमयी आणि दुसऱ्या दोन बायका झोंपी गेल्या होत्या. त्या दोघी होत्या मृणालिनी आणि गिरिजाया. नवद्वीपांत दुसऱ्या कुठें आसरा न मिळाल्यामुळें त्या या झोंपडींत येऊन राहिल्या होत्या. पहाटेच्या वेळीं तिघीही जाग्या झाल्या. पहिल्यानें रत्नमयी उठली. तिनें गिरिजायेला जागें केलें आणि ती आपल्या कामाला गेली. गिरिजाया मृणालिनीला हालवून उठवायचा प्रयत्न करीत होती, " जाग्या झालांत का बाईसाहेब ? "

" मी जागीच आहें. " मृणालिनी म्हणाली.

" जागत राहून कसला विचार करतां आहां ? " गिरिजायेनें विचारलें.

" विचार एकच," मृणालिनी म्हणाली, " दुसरा कसला विचार करणार ?"

" मी तरी काय करूं ? " गिरिजाया गंभीर होऊन म्हणाली, " माझी कांहीं चूक नाहीं. ते या शहरांतच आहेत एवढंच मला कळलंय, पण अजून त्यांचा नक्की पत्ता मला मिळाला नाहीं. आपल्याला दोनतीन दिवसच झाले इथं येऊन—आतां लागेलच त्यांचा पत्ता. "

" अन् त्यांचा पत्ता लागला नाहीं तर ! " मृणालिनी म्हणाली, " मरेपर्यंत या मजुराच्याच झोंपडींत रहावं लागणार मला ! आतां दुसऱ्या कुठंही आसरा मिळायचा नाहीं मला. "

पांघरुणांत तोंड लपवून मृणालिनी रडूं लागली होती. गिरिजायेच्या डोळ्यांतून देखील आसवांचा पाझर लागला होता.

इतक्यांत रत्नमयी घाबऱ्याघुबऱ्या धांवत आंत आली आणि म्हणाली, " या या, आधीं बाहेर या. आपल्या वडाच्या झाडाखालीं कुणीतरी झोंपलेला आहे. अगदीं अजब माणूस दिसतोय तो. "

गिरिजाया झोंपडीच्या दाराशीं आली. मृणालिनीही तिच्या मागोमाग आली होती. पाहिल्याबरोबर त्या दोघींनीं त्याला ओळखलें. आनंदसागराला भरतें आलें. मृणालिनीनें गिरिजायेला कडकडून मिठी मारली. गिरिजाया गाऊं लागली. तो गाण्याचा आवाज मूर्छित पडलेल्या हेमचन्द्राच्या कानीं गेला होता. तें स्वप्न आहे असें त्याला वाटलें होतें.

गिरिजायेला गाण्याची लहर आली आहे असें पाहून मृणालिनी म्हणाली, " गप् रहा चांडाळणी. त्यांना भेटतां कामा नये आपण. ते पहा, ते पहा जागे होत आहेत. इथं आड राहून ते काय करतात तें पहा. कुठं जात असले तर त्यांच्या पाठोपाठ जा !—हें काय ! यांचं सर्वांग रक्तानं माखल्यासारखं दिसतंय ?—चल तर, मीही येतें तुझ्याबरोबर."

हेमचन्द्र आतां जागा झाला होता. दिशा फांकल्या आहेत असें पाहून तो भाल्याच्या काठीचा आधार घेऊन उठून उभा राहिला आणि आपल्या वसतिस्थानाकडे जायला निघाला, तेव्हां रत्नमयीनें विचारलें, " हे कोण तुमचे ? "

मृणालिनी म्हणाली, " देव जाणे ! "

● ● ●

## —: २ :—

कांहीं वेळ विश्रांती मिळाल्यामुळें हेमचन्द्र बराचसा सावरला होता. आतां रक्त वाहायचेंही थांबलें होतें. भाल्याची काठी टेकीत टेकीत तो घरीं येऊन पोंचला. दाराशीं मनोरमा उभी होती. मृणालिनी आणि गिरिजाया यांनीं आड राहून मनोरमेला पाहिलें.

चित्रांतल्या पुतळीसारखी मनोरमा ताठरून राहिली होती. तिला पाहून मृणालिनीला वाटलें, ‘ माझा नाथ जर रूपाला भाळला असेल तर माझ्या सुखाचा सूर्य उगवणार कसा ? ’

गिरिजायेला वाटलें, ‘ राजपुत्रावर जर सौंदर्यानें भुरळ घातली तर माझ्या धनिणीचं कपाळ फुटलंच म्हणायचं ! ’

हेमचन्द्र मनोरमेपाशीं आला आणि म्हणाला, “ अशी उभी कां राहिली आहेस मनोरमा ? ”

मनोरमा कांहीं बोल्ली नाहीं. हेमचन्द्रानें पुन्हा हांक मारली, “ मनोरमा ! ”

तरीही तिनें उत्तर दिलें नाहीं. आकाशाकडे सारखी नजर लावून ती स्तब्ध राहिली होती. हेमचन्द्रानें पुन्हा विचारलें, “ काय झालंय मनोरमा ? ”

आकाशाकडे लागलेली नजर हळुहळु फिरवीत मनोरमेनें आतां ती हेमचन्द्राकडे रोखली. डोळ्याचें पातेंसुद्धां न हालवतां ती कांहीं वेळपर्यंत हेमचन्द्राकडे पहात राहिली होती. इतक्यांत रक्तानें माखलेल्या त्याच्या पोषाखाकडे तिची नजर गेली. तिनें दचकून विचारलें, “ हें काय हेमचन्द्र, हें रक्त कसलं ? तुमचं तोंड असं सुकलेलं कां ? जखम झाली आहे का तुम्हाला ? ”

हेमचन्द्रानें बोटानेंच आपल्या खांद्यावरची जखम दाखवली. मनोरमेनें त्याच क्षणीं हेमचन्द्राचा हात धरून त्याला घरांत नेऊन एका आसनावर बसवलें. धांवत जाऊन तिनें पाण्याचें भांडें आणलें आणि हेमचन्द्राच्या अंगावरील एकेक कपडा काढून रक्तानें भरलेलें त्याचें सर्वांग तिनें धुवून काढलें. शेजारच्या परसवांतून कोंवळ्या दुर्वा आणून दातानीं चावून त्याचा रस तिनें जखमेंत भरला आणि एक चिंधी घेऊन तिनें ती जखम व्यवस्थितपणें बांधून टाकली. एवढें झाल्यावर तिनें विचारलें, “ आतां काय करणार हेमचन्द्र ? सारी रात्र जागरण घडलंय, थोडी झोंप घेणार का आतां ? ”

हेमचन्द्र म्हणाला, “ झोंपेच्या अभावीं अगदीं थकून गेलों आहें मी मनोरमा. ”

मृणालिनी आड राहून पहायचा प्रयत्न करीत होती. चकित झाली होती. तिनें गिरिजायेला विचारलें, “ कोण ग ही ? ”

गिरिजाया म्हणाली, “ मी आतांच ऐकलं—तिचं नांव आहे मनोरमा. ”

" ही हेमचन्द्राचीच का मनोरमा ? " मृणालिनीनें विचारलें.

" तुला काय वाटतं ? " गिरिजाया म्हणाली.

" मला वाटतंय, " मृणालिनी म्हणाली, " मनोरमा मोठी भाग्याची ! मला हेमचन्द्राची सेवा करतां आली नाहीं—सेवा केली ती तिनं. ज्या सेवेसाठीं माझं अंतःकरण पिचतंय—तें काम उरकलं मनोरमेनं—देव बिचारीला सुखी ठेवो. आतां आपण घरीं जाऊं गिरिजाया–आतां आपण इथं रहाणं योग्य नाहीं. तूं इथंच कुठं तरी आसपास रहा, आणि यांची खबर घेऊन येऊन मला कळव. ही मनोरमा कुणीही असो, हेमचन्द्र माझाच—माझाच ! "

• • •

## —: ३ :—

मनोरमा आणि हेमचन्द्र घरांत प्रवेश करतांच मृणालिनीला निरोप देऊन बागेतल्या घराबाहेर गिरिजाया येरझाऱ्या घालूं लागली. जिथें जिथें खिडकी उघडी होती तिथं हळूच मान उंच करून ती आंत पाहून घेऊं लागली. एका खोलींत हेमचन्द्र बिछान्यावर आडवा झालेला होता. त्याच्या उशाशीं मनोरमा बसली होती. गिरिजाया त्या खिडकीच्या खालीं थांबली. गेल्या रात्रीं याच खिडकींत हेमचन्द्राला यवन दिसला होता.

हेमचन्द्र आणि मनोरमा यांचें चाललेलें भाषण ऐकण्यासाठीं म्हणून ती बसली होती खरी, पण हेमचन्द्र झोंपी गेल्यामुळें त्यांचें कांहींच भाषण झालें नाहीं. खिडकीच्या खालीं एकटंच बसून रहाणें गिरिजायेला कठीण गेलें. तिला वाटलें, दिग्विजय तरी कोठें जवळपास असता तर—

कांहीं वेळानें गिरिजायेची इच्छा पुरी झाली, हेमचन्द्र जागा झाला तेव्हां मनोरमेनें त्याला विचारलें, " कशी काय झोंप लागली ? "

" झोंप चांगली लागली. " हेमचन्द्र म्हणाला, " आतां बरं वाटतंय. "

मनोरमा म्हणाली, " तुम्हाला जखम कशी झाली तें आतां मला सांगा. "

हेमचन्द्रानें रात्रीं घडलेल्या घटनांची हकिकत तिला थोडक्यांत सांगितली. ती ऐकतांच मनोरमा विचारांत पडल्यासारखी दिसली.

हेमचन्द्र म्हणाला, "तुझे प्रश्न संपले ना? आतां माझ्या प्रश्नांचीं उत्तरं दे. काल रात्रीं तूं मला सोडून गेलीस त्यानंतर काय काय झालं तें मला सांग."

मनोरमा अगदीं खालच्या आवाजांत बोलूं लागली, गिरिजायेला तें ऐकूं आलें नाहीं. कांहींतरी अगदींच गुप्त गोष्टी असाव्या असा तिनें अंदाज केला. त्यांचें पुढील भाषणही तसेंच अगदीं खालच्या आवाजांत चालू आहे असें पाहून गिरिजाया उठली.

गिरिजायेच्या मनांत बरेच प्रश्न उभे राहिले होते. तिला वाटलें, यांत कांहीं-तरी रहस्य आहे.

मनोरमा फार सुंदर होती—आगीच्या शेजारीं लोणी वितळल्याशिवाय कसें राहील? मनोरमेचें हेमचन्द्रावर प्रेम असलें पाहिजे, नाहीं तर त्याच्यासाठीं ती इतकी कां तळमळेल? दोघेंही एकत्र राहात होतीं—रात्रीं अपरात्रीं एकटींच फिरत होतीं—कांहीं बोलायचें तर गुपचुप बोलत होतीं—

एकंदरींत सकृत्‌दर्शनी ही परिस्थिती संशयास्पद दिसत होती. मृणालिनीचें हेमचन्द्रावर प्रेम होतें. हेमचन्द्रही मृणालिनीवर प्रेम करीत होता!—अगदीं बरोबर! पण मृणालिनी दूर होती—दृष्टीआड होती. मनोरमा समोर होती—निकट सहवासांत होती!

या प्रकरणाचा निर्णय लावायचें तिनें ठरवलें आणि ती त्या घराच्या दाराशीं येऊन उभी राहिली.

• • •

## —: ४ :—

गिरिजाया गाऊं लागली—

> **सखि मज जीवन मरण समान ॥**
> **व्रजकिशोर मज टाकुनि गेला ।**
> **व्रजवधु सांडिल प्राण ॥**

तें गाणें हेमचन्द्राच्या कानीं गेलें. स्वप्नांत ऐकलेल्या संगीतासारखे ते सूर त्याच्या कर्णेन्द्रियाला जाणवले. हेमचन्द्र वर उठून ऐकूं लागला.—गिरिजाया गात होती—

**आधिं नाहिं कळलें। रूपिं मन रमलें।**
**फसलें सकल विधान॥**
**यमुनाजळिं सखि। ही तनु सांडिन।**
**किंवा करिन विषपान॥**

"हें काय?" हेमचन्द्र म्हणाला, "मनोरमा, हा आवाज गिरिजायेचाच!" असें म्हणून हेमचन्द्रानें बिछान्यावरून खालीं उडी मारली. गिरिजाया गात होती—

**वनिंचि वेल गळां। बांधुनि अवकळा।**
**तरुवरि घेइन फांस।**
**हरि हरि नामें। जपतां प्रेमें।**
**देइन हें असुदान॥**

हेमचन्द्र गिरिजायेसमोर येऊन उभा राहिला. तो चकित होऊन म्हणाला, "कोण? गिरिजाया! तूं इथं कुठं गिरिजाया? कां आलीस इथं? केव्हां आलीस या शहरांत?"

"पुष्कळ दिवस झाले मला इथं येऊन." गिरिजाया म्हणाली आणि गाऊं लागली—

**व्रजकिशोर मज टाकुनि गेला।**
**व्रजवधु सांडिल प्राण॥**

"या देशांत कशाला आलीस तूं?" हेमचन्द्रानें विचारलें.

"भीक मागणं हा माझा धंदा!" गिरिजाया म्हणाली, "राजधानीचं शहर आहे हें, इथं पुष्कळशी भिक्षा मिळेल म्हणून आलें."

"मृणालिनी कशी काय आहे? कुठं आहे?" हेमचन्द्रानें विचारलें, "तुला भेटली होती का ती?"

गिरिजाया गाऊं लागली—

**यमुनाजलिं सखि तनु ही सांडिन।**
**किंवा करिन विषपान॥**

"आतां पुरे झालं तुझं गाणं!" हेमचन्द्र म्हणाला, "आधीं माझ्या प्रश्नाचें उत्तर दे. मृणालिनी कुठं आहे? ती भेटली होती का तुला?"

"मृणालिनी मला कुठली भेटणार?" गिरिजाया म्हणाली, "—हें गाणं तुम्हाला गोड लागत नसेल तर दुसरं म्हणतें.

"तुझं गाणं राहूं दे," हेमचन्द्र म्हणाला, "मी तुला विनवून विचारतों आहें, मृणालिनीची खबर सांग. मृणालिनीची भेट कां घेतली नाहींस?"

"ती या गौडनगरांत नाहीं." गिरिजाया म्हणाली, "ती गेली आहे मथुरेला."

"मथुरेला का?" हेमचन्द्रानें विचारलें, "कुणाबरोबर गेली मथुरेला? कशी गेली? कां गेली?"

गिरिजाया म्हणाली, "तिच्या बापाला तिचा पत्ता लागला वाटतं. माणसं पाठवून तो तिला घेऊन गेला. तिचं लग्न ठरलंय वाटतं! तिचं लग्न लावून देण्यासाठीं घेऊन गेला वाटतं तिचा बाप."

हेमचन्द्रानें तोंड फिरवलें. त्याची मुद्रा तिला पाहातां आली नाहीं, त्याचप्रमाणें त्याच्या खांद्यावर झालेली जखम आणि त्या जखमेंतून वाहाणारें रक्तही तिला दिसलें नाहीं.

पुन्हा तिच्याकडे पाहून हेमचन्द्र म्हणाला, "मोठी उत्तम बातमी दिलीस गिरिजाया! फार छान झालं!" असें म्हणून हेमचन्द्र पुन्हाः आपल्या घरांत गेला.

गिरिजायेच्या मस्तकावर आभाळ कोसळलें. मृणालिनीच्या लग्नाची खोटीच बातमी सांगून हेमचन्द्राची कसोटी पहाण्याचा आपण जो प्रयत्न केला, ती आपली चूक झाली असें तिला वाटलें. मृणालिनीच्या लग्नाची बातमी ऐकून हेमचन्द्राच्या मनावर परिणाम होईल, तो चिडून रागावेल, असें तिला वाटलें होतें, पण तसें कांहीच झालें नाहीं. तिनें कपाळावर हात मारून घेतला. ती आपल्याशींच म्हणाली, "काय केलं मी हें! कां उगीच खोटं बोललें! ती बातमी ऐकून हेमचन्द्राला आनंद झाला!—उत्तम बातमी म्हणाला!—आतां माझ्या धनिणीची काय दशा होईल!

" ही बातमी चांगली आहे ! " असें हेमचन्द्रानें कां म्हटलें तें गिरजायेला कळलें नाहीं. कसें कळावें ? किती झालें तरी ती भिकारीण ! आंतल्या आंत तो भडकून उठला होता. तो त्याचा रागाचा उद्‌गार होता. गिरजायेला त्याचें मर्म कळलें नाहीं. तिला वाटलें, हें आनंदाचें लक्षण.

कुणी तिला भिक्षा घातली नाहीं—आणि तीही भिक्षेसाठीं वाट पहात बसली नाहीं. ती सरळ आपल्या मुक्कामाकडे गेली.

• • •

## —: ५ :—

माधवाचार्यांचा दौरा आतां संपला होता. ते नवद्वीपला येऊन पोंचले होते. आल्याबरोबर त्यानीं हेमचन्द्राची भेट घेतली आणि आपल्या दौऱ्यांत घडलेल्या सर्व घटना त्यांनीं त्याला निवेदन केल्या.

माधवाचार्य म्हणाले, " एवढे श्रम केले त्यांचं कसंबसं सार्थक झालं म्हणायचं. या देशांतले जे मांडलीक राजे आहेत त्यांनीं युद्धाच्या कामीं मदत देण्यासाठीं आपलं सैन्य घेऊन जायचं कबूल केलंय. लवकरच ते सारे नवद्वीपला येऊन गोळा होतील. "

हेमचन्द्र म्हणाला, " आजच जर ते येऊन पोंचले नाहींत तर सारा खटाटोप फुकट जाईल. यवनांचं सैन्य आलं आहे. त्यांनीं जंगलांत मुक्काम ठोकला आहे. आजकाल ते नगरावर चाल करून येणार असं वाटतंय. "

माधवाचार्यांच्या अंगावर कांटा उभा राहिला. ते म्हणाले, " गौडेश्वर काय करतो आहे ? "

" कांहीं सुद्धां नाहीं. " हेमचन्द्र म्हणाला, " मला वाटतं, ही बातमी राजापर्यंत अजून पोंचली सुद्धां नसावी. काल मला ती कळली ती केवळ योगायोगानं."

माधवाचार्यांनीं विचारलें, " मग तूं ही बातमी राजाच्या कानीं कां घातली नाहींस ? "

हेमचन्द्र म्हणाला, " ही बातमी मला कळायला अन् वाटेंत दरोडेखोरांनीं माझ्यावर हल्ला करायला एकच गांठ पडली. मी जखमी होऊन पडलों.

थोड्याच वेळापूर्वी मी घरीं येऊन पोंचलों. अत्यंत थकून गेलों असल्यामुळें थोडीशी विश्रांती घेतली. आतां तिकडेच निघालों होतों."

"तर मग तूं आतां थोडी विश्रांती घे." माधवाचार्य म्हणाले, "मी राजाची भेट घेतों. त्यानंतर जें कांहीं घडेल तें तुला येऊन सांगेन." असें म्हणून माधवाचार्य उठून उभे राहिले.

ते जायला निघाले आहेत असें पाहून हेमचन्द्र म्हणाला, "प्रभू! आपण गौडदेशांत गेलां होतां असं म्हटलंत—"

त्याच्या प्रश्नाचें धोरण ध्यानीं येऊन माधवाचार्य म्हणाले, "हो, मी तिकडे गेलों होतों. तुला मृणालिनीची खबर हवी आहे ना? मृणालिनी तिथं नाहीं."

"कुठं गेली ती?" हेमचन्द्रानें विचारलें.

"तें मला माहीत नाहीं" माधवचार्य म्हणाले, "ती कुठं गेली तें कुणालाच माहीत नाहीं."

"कां गेली ती?"

"आतां ती गोष्ट राहूं द्या." माधवाचार्य म्हणाले, "लढाई संपल्यावर मी सारं कांहीं सांगेन."

भुंवया वर चढवून हेमचन्द्र म्हणाला, "खरी हकिगत कळली तर मला धक्का बसेल असं आपण मनांतसुद्धां आणूं नका. मलाही थोडं बहुत कळलंय— तुम्हाला जें कांहीं कळलं असेल तें संकोच न धरतां मला सांगा."

माधवाचार्य ज्यावेळीं गौड नगरांत गेले होते, त्यावेळीं हृषिकेशानें मृणालिनीची हकीगत त्यांना आपल्यापरीनें सांगितली होती. माधवाचार्यांना ती खरी वाटली होती. माधवाचार्य मुळचे स्त्रीद्वेष्टे—अर्थात त्यांना स्त्रीचरित्राची नीटशी कल्पना नव्हती. त्यांना वाटलें, ती बातमी कळल्यामुळें हेमचन्द्राचें मृणालिनीवरचें मन उडालें असेल. आतां दुसरें कोणतेंच विघ्न येणार नाहीं अशी कल्पना करून ते पुन्हा खालीं बसले आणि हृषिकेशानें सांगितलेली सर्व हकीगत त्यांनीं हेमचन्द्राला सांगून टाकली.

हेमचन्द्र कपाळावर हात घेऊन मुकाट्यानें माधवाचार्यांचं भाषण ऐकत होता. त्यांचें भाषण संपलें तरीही त्याच्या तोंडून शब्द बाहेर आला नाहीं.

माधवाचार्यांनीं त्याला पुन्हापुन्हा हाक मारली तरीही तो उत्तर देत नाहीं असें पाहून त्यांनी उठून त्याचा हात धरला आणि मोठ्या वात्सल्यपूर्ण वाणीनें ते म्हणाले, " वर पहा मुला, माझ्याकडे पहा, आणि तुला काय वाटतं तें सांग."

" कुणावर विश्वास ठेवूं ? " हेमचंद्र म्हणाला, " हृषिकेशानं हें असं सांगितलं अन् त्या भिकारणीनं वेगळीच बातमी दिली ! "

" कुठली भिकारीण ? " माधवाचार्य म्हणाले, " काय सांगितलं तिनं ? "

हेमचंद्रानें थोडक्यांत सर्व हकीगत सांगितली.

माधवाचार्य साशंक होऊन म्हणाले, " हृषिकेशनं सांगितलेली हकिकत खोटी असावी असं वाटतं तर ! "

" असं कसं म्हणतां ? " हेमचंद्र म्हणाला, " जें कांहीं झालं तें हृषिकेशच्या समोर ! " असें म्हणून तो उठून उभा राहिला, शेजारचा भाला त्यानं उचलून हातांत घेतला अन् थरथर कांपत तो त्या खोलींत येरझारा घालूं लागला.

"काय आलंय पुन्हा तुझ्या मनांत ?" आचार्यांनीं विचारलें. हातांतील भाला दाखवून हेमचंद्र म्हणाला, "या भाल्यानं मृणालिनीचा जीव घेणार आहें मी !"

हेमचंद्राची एकदम बदललेली मुद्रा पाहून माधवाचार्य घाबरले. कांहीं न बोलतां ते तिथून निघून गेले.

सकाळींच मृणालिनी म्हणाली होती, " हेमचंद्र माझाच—माझाच !—"

● ● ●

## —: ६ :—

तिसऱ्या प्रहरीं माधवाचार्य पुन्हा आले. त्यानीं एक विशेष बातमी आणली होती. यवनसेना आली आहे खरी, पण आजूबाजूचे राजे बंड करतील असें वाटल्यावरून यवनांचा सेनापती तह करायला तयार आहे, अशी घोषणा पशुपतीनें केली होती. दुसऱ्याच दिवशीं त्याचा दूत यवनाकडे जाणार होता, तो परत येईपर्यंत युद्धाची तयारी करायचें त्यानें तहकूब केलें होतें. ही बातमी सांगून माधवाचार्य म्हणाले, " या पशुपतीच्या अकलेवर विसंबून हा कुलांगार राजा आपलं राज्य घालवून बसणार खास ! "

ते त्यांचे उद्गार हेमचन्द्राच्या कानीं गेले नसावे. त्याची मनःस्थिती ठिकाणावर नाहीं असें पाहून माधवाचार्य तिथून निघून गेले.

संध्याकाळच्या पूर्वी मनोरमा हेमचन्द्राच्या बैठकीच्या जागीं आली. हेमचन्द्राला पाहून मनोरमा म्हणाली, "भाई, तूं असा कां?"

हेमचन्द्रानें विचारलें, "असा कां म्हणजे कसा?"

मनोरमा म्हणाली, "तुमचा चेहरा श्रावणांतल्या आकाशासारखा काळवंडलेला आहे. भाद्रपदांतल्या गंगेसारखा रागानं उसळला आहे. अशा भुवया कां चढवल्या आहेत या? डोळे असे आळसावलेले कसे?—आणि हें काय! डोळ्यांत पाणी? रडतां आहां तुम्ही?"

हेमचन्द्रानें मनोरमेच्या तोंडाकडे पाहिलें आणि पुन्हा नजर खालीं केली. पुन्हा समोरच्या खिडकीकडे त्यानें नजर वळवली. पुन्हा मनोरमेकडे पाहिलें. मनोरमेला कळून चुकलें, कीं त्याच्या नजरेच्या या गतींत कोणताच उद्देश नव्हता. बोलावें असें मनांत येतें पण बोलायचें नसतें, त्यावेळीं माणसाची नजर अशी होते. मनोरमेनें विचारलें, "हेमचन्द्र, असं काय झालं आहे?"

"कांहीं नाहीं!" हेमचन्द्र म्हणाला.

मनोरमा पहिल्यानें कांहीं बोलली नाहीं. पण तो बोलत नाहीं असें पाहून ती म्हणाली, "कांहीं नाहीं असं कां म्हणतां? छी! छी! अशानं मनांत विषाचं बीज रुजतं." बोलतां बोलतां मनोरमेच्या डोळ्यांवाटे एक आंसवाचा बिंदू ठिबकला. ती हेमचन्द्राच्या तोंडाकडे झटक्यानें पाहून म्हणाली, "मला कां सांगत नाहीं? मी बहीण ना तुमची?"

मनोरमेची मुद्रा, तिच्या भाषणांतील कळकळ, मार्दव आणि सहृदयता हेमचन्द्राच्या अंतःकरणाला जाणवली. तो विरघळून गेला आणि म्हणाला, "माझ्या मनांतल्या भावना अन् यातना बहिणीला सांगण्याजोग्या नाहींत."

मनोरमा म्हणाली, "तर मग मी तुझी बहिणच नाहीं का?"

हेमचन्द्र म्हणाला, "माझं मनींचं दुःख बहिणीला सांगण्याजोगं नाहीं—दुसऱ्या कुणालाही सांगण्याजोगं नाहीं."

हेमचन्द्राचा गळा दाटून आला होता. त्याची मनस्थिती पाहून मनोरमा अगदींच अस्वस्थ झाली. बोलतां बोलतां हेमचन्द्राचा स्वर बदलला. त्याच्या

डोळ्यांतून ठिणग्या उडूं लागल्या. दातांनीं ओठ चावून तो म्हणाला, "माझं दुःख होय ! तसं कांहीच नाहीं ! मी हार समजून साप गळ्यांत घातला— आतां तो झुगारून दिलाय."

मनोरमा हेमचंद्राकडे तशीच सारखी टक लावून पहात राहिली होती. हळुहळु तिची मुद्रा बदलली. ती मोठ्या मायेनें गोड गोड हंसत त्याच्याकडे पाहूं लागली. तिची वृत्ती आतां प्रौढेला शोभेशी झाली होती. ती म्हणाली, "कळलं ! नकळत तुम्ही प्रेम केलं, त्याचा परिणाम भलता झाला ! होय ना ? छे छे ! ही प्रतारणा ! जो दुसऱ्याशीं प्रतारणा करतो, तो असतो वंचक—पण जो स्वतःशींच प्रतारणा करतो त्याचा सर्वनाश होतो."

"मी कसली प्रतारणा केली ?" हेमचन्द्रानें चकित होऊन विचारलें.

मनोरमा म्हणाली, "खरोखरच तुम्ही प्रेमांत पडलां होतां—नाहींतर कां रडलां असतां ? आज तुमच्या प्रेमाच्या स्थानांत तुम्हाला दोष दिसला असेल, म्हणून प्रेम संपलं असंच का तुम्ही म्हणतां आहां ? कुणी तुम्हाला ही अक्कल शिकवली ?—" बोलत असतांना मनोरमेचा वडिलकीचा भाव अधिकच उफाळून दिसूं लागला. ती म्हणाली, "स्वतःच्या वीरत्वाचं – पुरुषी अभिमानाचं लक्षण आहे हें. अभिमानानं काय आग विझवतां येते ? दुथडी भरून जाणाऱ्या गंगेचा वेगसुद्धां वाळूचा बांध घालून अडवतां येईल, पण प्रणयिनीला पापी समजून प्रणयाचा वेग केव्हांही आवरतां यायचा नाहीं. हरहर ! सारेच पुरुष असेच का प्रतारक असतात ?"

हेमचन्द्र थक्क होऊन गेला होता. हिलाच का आपण एक कोमल बालिका समजत होतों, असा त्याला प्रश्न पडला

मनोरमा बोलत होती, "पुराणांतल्या कथा माहीत आहेत का तुम्हाला ? पुराणांत सांगितलं आहे, भगीरथानं गंगा आणली तेव्हां एक माजलेला हत्ती तो गंगेचा ओघ अडवायला गेला अन् त्यांत स्वतःच वाहून गेला. काय याचा अर्थ ? गंगा म्हणजे प्रेमाचा प्रवाह— ईश्वराच्या पदकमलापासून त्याचा उगम— अत्यंत पवित्र असतो तो !— जो या प्रवाहांत बुडी मारतो तो पुण्यमय होतो ! मृत्युंजय शंकराच्या जटेंतून आलेला हा गंगेचा प्रवाह—जो मृत्यूवर विजय मिळवतो तोच प्रेमाला मस्तकीं धारण करायला समर्थ होतो ! मी जसं ऐकलंय

तसंच बोलतेय. माजलेला हत्ती म्हणजे दंभाचं प्रतीक—प्रेमाच्या प्रवाहांत तो वाहून जातो. पहिल्यानं एकच प्रवाह असतो या प्रेमाचा, पण तशी वेळ आली म्हणजे मग तो शेंकडों मुखांनीं वाहूं लागतो. प्रेम स्वभावसिद्ध झालं कीं शंभर ठिकाणीं त्याची पखरण होते—शेवटीं तें सागरांत मिसळून जातं—जगांतल्या सर्व जीवांमधें तें विलीन होतं."

"कुणी शिकवलं हें तुला ?" हेमचन्द्रानें विचारलें, "प्रेमाला पात्र आणि अपात्र असा भेदच का नाहीं ? पापी जीवावर देखील प्रेम करायचं का ?"

"हो हो, पाप्यावर देखील प्रेम करायचं. प्रेमांत पात्रापात्र हा भेद नाहीं. सर्वांवरच प्रेम करायचं ! प्रेमाचा जन्म झाला कीं तें उराशीं कवटाळून धरायचं—कारण प्रेम बिनमोल आहे ! भाई, जे चांगलं आहे त्याच्यावर कोण प्रेम केल्याशिवाय राहील ? कुणीही प्रेम करील चांगलं असतं त्यावर—पण जें वाईट आहे, त्याच्यावर स्वतःला विसरून जो प्रेम करतो, तो मला भारीच आवडतो. जाऊं दे. पण मी आहें माथेफिरू !"

"हें तुला कुणी शिकवलं मनोरमा ?" हेमचंद्र आश्चर्यचकित होऊन म्हणाला, "हा तुझा गुरू अलौकिकच असला पाहिजे !"

मनोरमा खालीं मान घालून म्हणाली, "ते सर्वज्ञ आहेत पण—"

"पण काय ?" हेमचंद्रानें विचारलें.

"पण ते आगीसारखे आहेत. प्रकाशही देतात अन् जाळूनही टाकतात." मनोरमा कांहीं वेळ पर्यंत मान खालीं घालून खालीं बघत राहिली होती.

हेमचंद्र म्हणाला, "मनोरमे तुझ्याकडे पाहिलं, तुझं भाषण ऐकलं, कीं मला वाटतं तूंही प्रेम केलं आहेस ! मला वाटतं ज्याची तूं अग्नीशीं तुलना केलीस, तेंच असलं पाहिजे तुझं प्रेमाचं स्थान !"

मनोरमा तशीच मुकाट राहिली होती. हेमचंद्र बोलत होता, "माझं एक सांगणं ऐक. स्त्रीजातीच्या दृष्टीनं सतीत्वासारखा दुसरा धर्म नाहीं. जिच्याठायीं सतीत्व नाहीं ती स्त्री डुकरीहून देखील अधम ! केवळ कृतीनंच सतीत्वाची हानी होते असं नाहीं, पतीशिवाय अन्य पुरुषाचं नुसतं चिंतन घडलं तरीही सतीत्वाची हानी होते. तूं विधवा आहेस—पतीखेरीज अन्य पुरुषाची अभिलाषा करशील तर तूं या लोकीं आणि परलोकीं देखील स्त्रीजातींत अधम ठरशील.

म्हणून म्हणतों, सावध ! जर असं कुठं तुझं मन गुंतलं असेल तर तें विसरून जा. ”

मनोरमा मोठमोठ्यानें हसूं लागली. तोंडावर पदर धरून ती हसूं आवरायचा प्रयत्न करीत होती तरीही तें आवरत नव्हतें. हेमचंद्राला तें आवडलें नाहीं. तो म्हणाला, “ हंसतेस कशाला ? ”

मनोरमा म्हणाली, “ भाई, जरा गंगातीरावर जाऊन उभा रहा. अन् गंगेला हांक घालून सांग, कीं बाई गंगे, तूं पुन्हा पर्वताकडे फिरून जा ! ”

“ असं कां म्हणतेस ? ” हेमचन्द्र म्हणाला.

“ विसरणं इतकं का सोपं आहे ? ” मनोरमा म्हणाली, “ तें आपल्या इच्छेवर का अवलंबून असतं ? राजपुत्रा, हाराला कालसर्प म्हणण्यांत काय सुख आहे ? मग त्या सर्पाचा विसर कां पडत नाहीं तुम्हाला ? ”

“ त्याच्या दंशाच्या विषामुळं ! ” हेमचन्द्र म्हणाला.

“ अन् त्यानं दंशच केला नाहीं तर ? ” मनोरमेनें विचारलें, “ मग विसर पडेल का त्याचा ? ” हेमचन्द्र कांहीं उत्तर देत नाहीं असें पाहून ती म्हणाली, “ तुमची फुलाची माळ कालसर्प झाली तरीही तुम्ही विसरत नाहीं तिला !— मी—मी तर पागल— मी माझा फुलाचा हार कां तोडून टाकूं ? ”

“ एका अर्थी तुझं म्हणणं खरं आहे, “ हेमचन्द्र म्हणाला, “ विसरून जाणं कांहीं आपल्या हातीं नसतं. स्वाभिमानानं आंधळा होऊन माणूस दुसऱ्याला जो उपदेश करतो त्यांत ‘ विसरून जा ’ असा उपदेश करण्यासारखं हास्यास्पद कांहीं नाहीं. कुणी म्हणतो पैशाचा लोभ सोड, यशाची इच्छा सोड, ज्ञानाची हांव सोड, भूक तहान सोड, निद्रा सोड—मग प्रेम सोड असं कसं म्हणतात कोण ? या सर्वांपेक्षां प्रेम अगदींच तुच्छ का ? या सर्वांपेक्षां प्रेमाचं महत्त्व कमी नाहीं खरं, पण धर्मापेक्षां मात्र तें मोठं नाहीं. धर्मासाठीं प्रेम सोडायला हवं. स्त्रीचा परमधर्म म्हणजे सतीत्व. म्हणूनच म्हणतोंय, वाटेल तें करून या प्रेमाचा संहार कर. ”

मनोरमा म्हणाली, “ मी अबला आहें. अजाण आहें. भाबडी आहें. धर्म आणि अधर्म कशाला म्हणतात तें कांहीं माहित नाहीं मला. मला माहित आहे तें एवढंच, कीं धर्माशिवाय प्रेमाचा उगम होत नाहीं. ”

"सावध मनोरमे, सावध!" हेमचन्द्र म्हणाला, "वासनेंतून भ्रांतीचा उगम होतो. भ्रांतींतून अधर्माचा उगम होतो. तुला झाली आहे ती भ्रांति. यावेळीं तूं विचार करून पहा, तूं व्यभिचारिणीं नाहीं का ठरायचीस?"

तिथें समोरच हेमचन्द्राची ढाल दिसत होती तिला हात लावून मनोरमा म्हणाली, "हें कसलं चामडं रे भाई?"

हेमचन्द्र हसूं लागला. त्यानें मनोरमेकडे पाहिलें—ती आतां तशीच पूर्वीची मुग्ध बालिका झाली होती.

●●●

## —: ७ :—

गिरिजाया पुन्हा त्या मजुराच्या घरीं आली. प्राण गेला तरी हेमचन्द्राच्या नव्या प्रेमप्रकरणाची हकिकत मृणालिनीला सांगायची नाहीं असें तिनें ठरवलें होतें. पिंजऱ्यांत कोंडलेल्या पाखरासारखी चंचल होऊन मृणालिनी तिची वाट पहात होती. गिरिजाया समोर दिसतांच ती म्हणाली, "भेटले का ते? कसे काय आहेत ते?"

"खुशाल आहेत." गिरिजाया म्हणाली.

"असं कां बोलतेस?" मृणालिनीनें विचारलें, "अगदींच उत्साह दिसत नाहीं तुझ्या बोलण्यांत. अशी विरसल्यासारखी कां बोलतेस? माझ्याशीं प्रतारणा करूं नकोस. हेमचन्द्राची प्रकृति सुधारली नाहीं का?"

गिरिजाया हंसून म्हणाली, "उगीच उतावीळ होतेस कशाला? आतां ते अगदीं साफ बरे झाले आहेत. उठून हिंडत फिरत आहेत."

"मनोरमेबरोबर त्यांचं झालेलं भाषण ऐकलंस का? काय ऐकलंस?"

गिरिजायेनें हेमचन्द्र जें बोलला होता तें तिला सांगितलें. मात्र त्या दोघांच्या ज्या कानगोष्टी झाल्या त्याबद्दलचा उल्लेख तिनें केला नाहीं. मृणालिनीनें विचारलें, "तूं भेटलीस का त्यांनां?" ती होय म्हणाली तेव्हां तिनें विचारलें, "ते काय म्हणाले?"

गिरिजाया म्हणाली, "त्यांनी तुझी खबर विचारली. मी सांगितलं, तूं खुशाल आहेस."

" मी इथं आहें तें सांगितलंस का त्यांना ? "

" नाहीं ! "

" तूं अशी मागं पुढं का करते आहेस गिरिजाया ? " मृणालिनीनें विचारलें, " तुझा चेहरा असा उतरलाय कां ? तूं माझ्याकडे पहातसुद्धां नाहींस ! कांहीं अमंगळ बातमी तर नाहीं ? तूं कांहींतरी चोरून ठेवते आहेस ! मी आतां स्वतःच जातें त्यांना भेटायला. वाटलं तर ये माझ्याबरोबर, नाहींतर मी एकटीच जाईन ! " असें म्हणून मृणालिनी माथ्यावरचा पदर पुढें ओढून घराबाहेर पडून तडक चालूं लागली.

गिरिजाया तिच्या मागोमाग धांवली. थोड्या अंतरावर तिनें तिला गांठलें आणि म्हटलें, " आतां मागं फिरा. अजून मी जें सांगितलं नव्हतं तें तुम्हाला सांगतें. "

गिरिजायेबरोबर मृणालिनी पुन्हा घरीं आली. हा वेळपर्यंत तिनें ज्या गोष्टी तिच्यापासून चोरून ठेवल्या होत्या त्या आतां उघड करून सांगितल्या.

हेमचन्द्राला गिरिजायेनें झुलवलें होतें, पण मृणालिनीची फसवणूक करणें तिला साधलें नाहीं.

●●●

## —: ८ :—

मृणालिनी म्हणाली, " असं पहा गिरी, 'बरं झालं' असं ते रागारागानं म्हणाले असतील, कां राग येऊं नये त्यांना ? "

गिरिजायासुद्धां आतां साशंक झाली होती. ती म्हणाली, " तसं होणं शक्य आहे खरं ! "

" तूं त्यांना तसं सांगितलंस काय म्हणून ? " मृणालिनी म्हणाली, " हें बरं केलं नाहींस ! त्याचं निराकरण केलं पाहिजे. तूं आतां जेवणाच्या तयारीला लाग तोंपर्यंत मी एक पत्र लिहून ठेवतें—जेवण झालं कीं तें पत्र नेऊन त्यांना दे. "

गिरिजाया निघून गेली तेव्हां मृणालिनीनें पत्र लिहिलें—

" गिरिजायेनें तुम्हाला खोटें सांगितलें. तिनें तसें खोटें सांगायचें कारण ती स्वतःच तुम्हाला निवेदन करील. मी मथुरेला गेलें त्या दिवशीं तुमची आंगठी पाहून मी घर सोडून निघालें, त्या दिवसापासून माझी मथुरेची वाट बंद झाली आहे. मथुरेला न जातां मी तुम्हाला पाहायला नवद्वीपला आलें आहें. नवद्वीपला येऊनही या क्षणापर्यंत मी तुमची भेट घेतली नाहीं त्याचें कारण एकच—माझ्या भेटीमुळें तुमचा प्रतिज्ञाभंग होऊं नये. "

तें पत्र घेऊन गिरिजाया पुन्हा हेमचन्द्राच्या घरीं गेली. मनोरमेबरोबर त्याचें जें बोलणें झालें होतें तें संपल्यानंतर हेमचन्द्र गंगेच्या दर्शनासाठीं जायला निघाला होता. वाटेंत त्याला गिरिजाया भेटली. तिनें तें पत्र त्याच्या हातीं दिलें आणि तें मृणालिनीनें दिलें आहे असें सांगितलें तेव्हां हेमचन्द्रानें विचारलें, " हें पत्र तुझ्या हातीं कसं आलं ? "

गिरिजाया म्हणाली, " मृणालिनी नवद्वीपांतच आहे. ती मथुरेला गेली असं मी तुम्हाला सांगितलं तें खोटं. हें पत्र तिनं स्वतःच लिहून दिलं आहे. "

हेमचन्द्रानें तें पत्र वाचलें नाहीं. त्या पत्राचे तुकडे तुकडे करून ते फेंकून देऊन तो म्हणाला, " तूं खोटं बोलत होतीस तें मला आधींच कळलंय. ज्या दुष्टेचं पत्र तूं घेऊन आली होतीस, ती लग्नासाठीं गेली नाहीं. हृषिकेशानं तिला घराबाहेर घालवून दिलं तें मला यापूर्वींच कळलंय. त्या कुलटेचं पत्र मी वाचणार नाहीं. आतां नीघ माझ्या समोरून ! "

गिरीजाया थक्क होऊन हेमचन्द्राच्या तोंडाकडे पहातच राहिली.

रस्त्यावरच्या एका झाडाची फांदी मोडून हातीं घेऊन हेमचन्द्र म्हणाला, " दूर हो, नाहींतर मी आतां तुला फटकावीन ! "

गिरिजायेला तें सहन झालें नाहीं. ती म्हणाली, " मोठे वीर पुरुष आहां खरे ! बायकांच्या समोर असं शौर्य दाखवायलाच का तुम्ही इथं आलां आहां ? कांहीं जरूरी नव्हती त्याची !—मगध देशांत राहून सुद्धां हें वीरत्व दाखवतां आलं असतं तुम्हाला. मुसलमानांचीं जुतीं उचलायचीं आणि गरीब दुबळ्या बायकांवर काठ्या उगारायच्या—छान ! "

हेमचन्द्र ओशाळला. त्यानें हातांतली काठी फेंकून दिली. गिरिजायेचा पारा अजून उतरला नव्हता. ती म्हणाली, "अन् असले हे तुम्ही मृणालिनीशीं लग्न करणार म्हणतां! मृणालिनी तर राहूंदेच, पण तुम्ही माझ्यासुद्धां लायक नाहीं!" असें म्हणून गिरिजाया मोठ्या फणकाऱ्यानें तिथून निघून गेली.

त्या भिकारणीचा हा दिमाख पाहून हेमचन्द्र थक्क होऊन गेला होता.

गिरिजाया परत घरीं आली आणि तिनें हेमचन्द्रानें ज्या प्रकारें तिला वागवलें त्याची सर्व हकिकत मृणालिनीला तपशीलवार सांगितली. यावेळीं तिनें कांहींच लपवून ठेवलें नाहीं. मृणालिनी त्यावर कांहींच बोलली नाहीं, कीं तिनें दुःखही प्रकट केलें नाहीं. ऐकत असतांना तिची जी मनःस्थिती होती, त्याच अवस्थेंत ती राहिलेली पाहून गिरिजाया साशंक झाली. या विषयाची चर्चा करण्याची ही वेळ नव्हे असें वाटून ती मुकाट्यानें बाजूला सरली.

मजुराच्या घरापासून जवळच एक बऱ्याच पायऱ्या असलेला तलाव होता. तिथें जाऊन गिरिजाया त्या पायऱ्यांवर बसली. शरदृतूंतल्या पौर्णिमेच्या झळझळित चांदण्यामुळें तलावांतील निळें निळें पाणी झळाळूं लागलें होतें. त्या तलावांतील अर्धीं उमललेलीं कमळें पाण्यांत प्रतिबिंबित होत होतीं. आजूबाजूला असलेल्या झाडांचीं पानेंसुद्धां सळसळत नव्हतीं.

तलावाच्या पायऱ्यांवर बसून गिरिजाया हळुहळु आपल्याशींच गाणें गुणगुणूं लागली. क्रमाक्रमानें तें गाणें स्पष्ट होऊं लागलें. हळुहळु तिचा स्वर चढूं लागला आणि थोड्या वेळानें लयतानबद्ध अशा तिच्या खणखणीत गाण्यानें आजूबाजूचा प्रदेश दणाणून गेला.

गात असतांना गिरजायेची नजर समोर गेली. चांदण्यांत मनुष्याची छाया पडली होती. तिनें मागें वळून पाहिलें. मृणालिनी तिथ उभी होती. तिच्या डोळ्यांवाटे आसवांच्या धारा लागल्या होत्या.

तें पाहून गिरजायेला आनंद झाला. ज्याअर्थीं मृणालिनीच्या डोळ्यांवाटे आसवें पाझरलीं, त्याअर्थीं तिच्या मनांतील क्लेश थोडेतरी कमी झाले असावेत असें तिला वाटलें. सर्वांनाच हें कुठें कळतें ? कुणी स्तब्ध झालेली व्यक्ति दिसली कीं आपण म्हणतों, 'हें काय ? हिच्या डोळ्यांत आसवं नाहींत, हिला

कसलं झालंय दुःख !' आसवें पाझरलीं कीं मनांतील दुःखांचा उपशम होतो हें सर्वांनाच कळलें, तर जगांतील पुष्कळशा क्लेशांचें निवारण झालें असतें.

कांहीवेळपर्यंत दोघीही कांहीं बोलल्या नाहींत. मृणालिनीच्या तोंडून शब्द बाहेर फुटत नव्हता आणि तिला कांहीं विचारावें असें गिरजायेला वाटत नव्हतें.

नंतर मृणालिनी म्हणाली, " गिरिजाये, आणखी एकदां तिकडे गेलं पाहिजे तुला. "

" पुन्हा त्या चांडाळाकडे कशाला जायचं ? " गिरिजाया म्हणाली.

" त्यांना चांडाळ म्हणूं नकोस ! " मृणालिनी म्हणाली, " त्यांना भ्रम झाला आहे ! या जगांत असा भ्रम कुणाला होत नाहीं ? हेमचन्द्र तसे नाहींत. मी स्वतः त्यांची भेट घेणार आहें. तूं माझ्याबरोबर चल. पाठच्या बहिणीपेक्षांही तुझं माझ्यावर अधिक प्रेम आहे—माझ्यासाठीं तूं काय करायचं ठेवलं आहेस ? मला निश्चितपणें माहीत आहे, कीं मला निष्कारण त्रास होईल असं तूं कांहीं करणार नाहींस, कीं माझ्यापाशीं खोटंही सांगणार नाहींस ! हें जरी खरं असलं तरीही माझा कांहींच अपराध नसतांना हेमचन्द्रानीं माझा कां त्याग केला हें त्यांच्याच तोंडून ऐकल्याशिवाय माझ्या मनाचं समाधान कसं होईल ! मी कुलटा म्हणून ते जर माझा त्याग करीत असतील अन् ते स्वतःच जर तसं सांगतील, तर मी आनंदानं प्राण देईन. "

" प्राण देईन ! " गिरिजाया चकित होऊन म्हणाली, " म्हणतेस काय मृणालिनी ? " मृणालिनी कांहीं बोलली नाहीं. गिरिजायेच्या खांद्यावर हात टाकून ती रडूं लागली, तसें गिरिजायेलाही रडें कोसळलें.

●●●

—: ९ :—

आचार्यांच्या भाषणावर विश्वास ठेवून मृणालिनी कुलटा आहे असा जरी हेमचन्द्रानें समज करून घेतला होता, मृणालिनीचें पत्र न वाचतां जरी त्यानें त्याचे तुकडे तुकडे करून टाकले होते, तिच्या दूतीला काठी घेऊन मारायला तो सरसावला होता, तरीही मृणालिनीवरचें त्याचें प्रेम नाहींसें झालें होतें असें मात्र मुळींच नव्हे.

मृणालिनीसाठीं राज्यत्याग करून तो मथुरेंत येऊन राहिला होता. मृणालिनीसाठीं प्रत्यक्ष आपल्या गुरूचा देखील अपमान करायला तो प्रस्तुत झाला होता. मृणालिनीसाठीं आपलें व्रत विसरून गौड देशांत येऊन एका भिकारणीला तिच्या शोधार्थ पाठवायला तयार झाला होता—आणि आतां ?—माधवाचार्यांना हातांतला भाला दाखवून तो म्हणाला होता, 'या भाल्यानें तिचा जीव घेईन!'—म्हणून काय त्याचें प्रेम एकदम नष्ट होऊन गेलें होतें ? खरें प्रेम काय असें एका दिवसांत नाश पावतें ? पर्वतावरून जमिनीवर कोसळणारें पाणी आपल्या ओघाचा मार्ग आंखतें, तें काय एक दिवसाच्या सूर्याच्या तापानें कोरडें पडत असतें ? ज्या मार्गानें पाणी जायचें असतें, त्याच मार्गानें तें गेल्याशिवाय रहात नाहीं. तो मार्ग अडवला तर पृथ्वी वाहून जाईल.

त्या रात्रींच हेमचन्द्र आपल्या शेजघरांत बिछान्यावर पडला होता. उघड्या खिडकीच्या चौकटीवर मस्तक टेकून सारखा बाहेर पहात होता—तो काय निसर्गाची रात्रीची शोभा पहात होता ? त्यावेळीं त्याला कुणी विचारलें असतें, कीं आज चांदणें आहे कीं अंधार आहे तर तें त्याला चट्कन सांगतां आलें नसतें. त्याच्या हृदयांत जो घनदाट अंधकार पसरला होता तोच त्याच्या नजरेसमोर होता. ज्याच्या हृदयाकाशांत अंधकार सामावलेला असतो, तो आसूं गाळूं शकत नाहीं.

ज्या माणसाच्या डोळ्यांतून कधीं एक टीप खालीं पडलें नाहीं, तो माणूस माणसाच्या जातींतला अधम समजावा. कुणीही केव्हांही त्याच्यावर विश्वास ठेवूं नये. अगदीं हटकून समजावें, कीं जगांतल्या सुखांचा त्यानें उपभोग घेतलेला नाहीं आणि परक्याचें सुख पाहून तेंही त्याला सहन झालें नाहीं.

स्वतःच्या मनावर विजय मिळवणारा कुणी महात्मा डोळ्यांतून एक टिपूससुद्धां न गाळतां आत्यंतिक मनःपीडा सहन करीत असेल—सहन करीलही—पण त्याच्या डोळ्यांतून पडलेलें एक आसूं जर ही भूमी भिजवीत नसेल तर तो केवढाही चित्तजयी महात्मा असला, तरी आपण एकाद्या मुर्दाड दरवडेखोराशींही संबंध ठेवूं, पण त्याच्याशीं ठेवणार नाहीं.

हेमचन्द्र रडत होता. जिला त्यानें पापिष्टा म्हटलें, आपल्या हृदयांत स्थान मिळायला अयोग्य असें म्हटलें, तिच्याच साठीं तो रडत होता. मृणालिनीच्या

दोषांची तो आलोचना करीत होता काय ? कदाचित करीतही असेल ! तरीपण मृणालिनीचें प्रेमपूर्ण मुखमंडल, तिच्या तोंडच्या प्रेमपूर्ण कथा, तिचा प्रेमपूर्ण सहवास या वेळीं त्याला आठवत होता, ती मृणालिनी काय अविश्वासू ?

एके दिवशीं मथुरेला असतांना हेमचन्द्र मृणालिनीला एक पत्र पाठवण्यासाठीं उत्सुख झाला होता. प्रत्यक्ष भेट घ्यायची नाहीं आणि हाताशीं तर कुणी माणूस नाहीं—काय करावें या विचारांत तो पडला असतांना खिडकीवाटे त्याला मृणालिनी दिसली. त्यानें काय केलें असेल त्या वेळीं ? एक आंबा घेऊन त्याच्यावर त्यानें अवश्य तो मजकूर लिहिला आणि मृणालिनीवर नेम धरून तो खिडकीवाटे फेंकला. तो आंबा पकडण्यासाठीं मृणालिनी थोडी पुढें सरसावली, त्यामुळें तें फळ तिच्या मांडीवर न पडतां तिच्या कानावर आदळलें. कानांतला डूल कान तुटून खालीं पडला. त्या जखमेंतून वाहणाऱ्या रक्तानें तिची मान भिजून गेली, तरीही तिनें हूं कीं चूं केलें नाहीं, कीं कानाला हात लावूनसुद्धां पाहिलें नाहीं. हंसत हंसत तिनें तो आंबा उचलला, वर लिहिलेला मजकूर वाचला आणि त्याच्याच दुसऱ्या बाजूला त्या पत्राचें उत्तर लिहून तिनें तो आंबा खालीं फेंकला. हेमचन्द्र जोंपर्यंत नजरेसमोर दिसत होता तोंपर्यंत खिडकींत उभी राहून हंसतमुखानें ती त्याच्याकडे पहात राहिली होती—

हेमचंद्राला तें आठवलें. ती मृणालिनी काय अविश्वासू ? शक्यच नाहीं !

त्याला आणखी एक घटना आठवली. एके दिवशीं मृणालिनीला विंचवानें नांगी मारली होती. त्या विषाच्या वेदनेनें ती मूर्छित व्हायला आली होती. या विषाचा उतारा तिच्या एका दासीला माहीत होता. ती दासी तें औषध आणायला गेली. तितक्यांत हेमचन्द्राची दूती तिथें आली आणि तिनें हेमचन्द्र बागेंत वाट पहात असल्याचें तिला सांगितलें. थोड्याच वेळांत औषध आलें असतें, पण मृणालिनीनें एक क्षणभरही वाट पाहिली नाहीं. विषाच्या त्या दारुण यातना विसरून ती हेमचन्द्राला भेटण्यासाठीं बागेंत गेली. विषाचा उतारा त्यावेळीं मिळाला नाहीं.

हेमचन्द्राला ती गोष्ट आठवली. ब्राह्मणाच्या कुळाला कलंकरूप झालेल्या या व्योमकेशासाठीं तीच मृणालिनी काय हेमचन्द्राशीं प्रतारणा करील ? छे छे ! असें कधींच व्हायचें नाहीं.

आणखी एक दिवसाची गोष्ट—हेमचंद्र मथुरेंतून गुरुदर्शनासाठीं जायला निघाला होता. मथुरेपासून एका प्रहराच्या वाटेवर आल्यानंतर हेमचन्द्र आजारी पडला. तो एका धर्मशाळेंत पडून राहिला होता. कुणीतरी ही बातमी मृणालिनीच्या कानीं घातली. त्याच रात्रीं मृणालिनी एक दाई बरोबर घेऊन अंधारांतून एक योजन रस्ता पायीं तुडवीत हेमचन्द्राला पहाण्यासाठीं आली. ती त्या धर्मशाळेंत पोंचली त्यावेळीं पायपीट करून अगदीं निर्जीव झाली होती. तिच्या पायाची चाळण होऊन त्यांतून रक्त वाहूं लागलें होतें. तरीही त्याच रात्रीं बापाच्या भीतीनें ती तशीच पायपीट करीत घरीं गेली. घरीं गेल्यावर ती स्वतःच आजारी होऊन पडली—

हेमचन्द्राला ती घटना आठवली. तीच मृणालिनी काय नराधम व्योमकेशासाठीं त्याचा त्याग करील ? अविश्वासू होईल ? असल्या बातमीवर विश्वास ठेवील तोच अविश्वासू—तोच महामूर्ख—तोच नराधम !

हेमचन्द्राच्या हजारवेळ मनांत येत होतें, मृणालिनीचें पत्र आपण कां वाचलें नाहीं ? नवद्वीपला ती कां आली होती याची चौकशी आपण कां केली नाहीं ?

त्या पत्राचे तुकडे करून ज्या जागीं त्यानें टाकले होते, त्या जागेपर्यंत तो पुन्हा गेला. मिळतील तेवढे कागदाचे तुकडे गोळा करून जुळवून पहावे असें त्याच्या मनांत आलें होतें, पण काळोखांत त्याला कांहींच दिसलें नाहीं. कदाचित ते कपटे वाऱ्यानें उडून गेले असावेत. त्यावेळीं त्याला वाटलें, ते कपटे मिळण्यासाठीं आपला उजवा हात कुणी तोडून मागितला तरीदेखील तो द्यावा.

पुन्हां त्याच्या मनांत आलें, आचार्य खोटें कां सांगतील ? ते सत्यनिष्ठ होते. विशेषतः ते त्याच्यावर पोटच्या मुलापेक्षांही जास्त प्रेम करीत होते. या बातमीमुळें आपल्यांला मरणाधिक यातना होतील याची त्यांना जाणीव होती—मग खोटेंच सांगून आपल्याला ते कां यातना देतील ?

आणि त्यांनीं तरी ती बातमी स्वेच्छेनें कुठें सांगितली होती ? आपणच दंभाला बळी पडून ती बातमी त्यांच्याकडून काढून घेतली होती. सर्व कांहीं आपल्याला माहीत आहे असें आपण सांगितलें त्याचवेळीं त्यांनीं ती बातमी सांगितली. खोटेंच बनवून त्यांना सांगायचें असतें तर त्यांनीं पहिल्यानेंच आढेवेढे कां घेतले असते ? तर काय हृषिकेशनें त्यांना खोटेंच सांगितलें ? पण हृषिकेश तरी निष्कारण आपल्या गुरूपाशीं खोटें कां बोलेल ?

आणि दुसरें असें, कीं मृणालिनीही त्याचें घर टाकून नवद्वीपला कां येईल ?

हेमचन्द्र अशा रीतीनें विचार करीत असतांना त्याचा चेहरा काळवंडून जात होता. कपाळावर घामाचे थेंब डंवरत होते. तो बिछाना सोडून उठला. तो दातांनीं आपले ओठ चावीत होता. त्याचे डोळे लाल झाले होते. हातीं भाला घेण्यासाठीं त्याची मूठ वळवळूं लागली होती.

पुन्हां त्याच्या नजरेसमोर मृणालिनीचें प्रेममय मुखमंडल दिसूं लागलें, तेव्हां मुळांत उखडलेल्या वृक्षासारखा तो बिछान्यावर कोसळून पडला. उशींत तोंड खुपसून तो लहान मुलासारखा रडूं लागला.

त्याचवेळीं त्याच्या शेजघराचें दार उघडलें गेलें. हेमचन्द्राला वाटलें, कीं मनोरमा आली. त्यानें वर नजर करून पाहिलें, तों त्याला दिसून आलें कीं ती त्याच्या प्रेमाची प्रतिमाही नव्हती. ती गिरिजाया होती.

पहिल्यानें तो आश्चर्यचकित झाला, नंतर त्याला आनंद झाला, शेवटीं त्याचा चौकसपणा जागा झाला. त्यानें विचारलें, " कां आलीस तूं पुन्हा ? "

गिरिजाया म्हणाली, " मी दासी आहें मृणालिनीची. मृणालिनीचा तुम्ही त्याग केला, पण ती कांहीं अजून तुम्हाला टाकायला तयार नाहीं. अर्थात मला पुन्हा यावं लागलं. मला काठी घेऊन बडवावं असं वाटत असेल तुम्हाला, तर खुशाल करा तसं ! माझ्या धनिणीसाठीं तें सुद्धां सहन करायचं मी ठरवलंय. "

तिच्या या खोंचदार बोलण्यानें हेमचन्द्र ओशाळला. तो म्हणाला, " कांहीं भ्यायचं कारण नाहीं. मी बायकांच्या अंगावर हात टाकणार नाहीं !—कां आली आहेस तूं ? मृणालिनी कुठं आहे ? मघाशीं तूं म्हणाली होतीस, कीं ती इथं नवद्वीपला आलेली आहे—कशाला आली आहे ती इथं ? तिचं पत्र मीं वाचलं नाहीं ती चूक झाली माझी ! "

गिरिजाया म्हणाली, " मृणालिनी नवद्वीपला आली आहे ती तुम्हालाच भेटायला. "

हेमचन्द्राच्या अंगावर रोमांच उभे राहिले. कुलटा म्हणून आपण अपमान केला तो काय याच मृणालिनीचा ? त्यानें गिरिजायेला पुन्हा विचारलें, " मृणालिनी कुठं आहे ? "

गिरिजाया म्हणाली, " तुम्हाला एकदां शेवटचं पाहून घेण्यासाठीं अन् तुमचा निरोप घेण्यासाठीं ती सरोवराच्या तीरावर वाट पहाते आहे. चला

तिकडे." असें म्हणून गिरिजाया चालूं लागली. हेमचन्द्र धांवतच तिच्या मार्गें गेला.

गिरिजाया तलावाकडे आली त्यावेळीं मृणालिनी पायऱ्यांवर बसून राहिलेली होती. हेमचन्द्रही तिच्या मागोमाग तिथें आला होता. गिरिजाया म्हणाली, "उठा आतां. राजपुत्र आले आहेत."

मृणालिनी उठून उभी राहिली. एकमेकांनीं एकमेकांना पाहिलें, मृणालिनीचे डोळे आसवांनीं भरून आले, पहातां पहातां तिला कांहीं दिसेनासें झालें आणि झाडाच्या फांदीचा आधार सुटल्यावर त्यावरची वेल जशी कोसळून खालीं पडते तशीच हेमचन्द्राच्या पायापाशीं ती कोसळून पडली.

गिरिजाया तिथून निघून गेली.

● ● ●

## —: १० :—

हेमचन्द्रानें मृणालिनीचा हात धरून तिला उचलून उभें केलें. तीं आतां एकमेकांच्या समोर उभीं होतीं. इतक्या दिवसांनीं त्या दोघांची गांठ पडली होती. कांहीं दिवसांपूर्वी एकदां प्रदोषकालीं यमुनेच्या किनाऱ्यावर नक्षत्रांचें प्रतिबिंब यमुनेच्या पाण्यांत पडलेलें पहात असतांना भरल्या डोळ्यांनीं त्यानीं एकमेकांचा निरोप घेतला होता. त्यानंतर आज ही त्यांची भेट झाली होती. उन्हाळा जाऊन पावसाळा आला, पावसाळ्यानंतर शरद् ऋतू आला, पण त्यांच्या हृदयाच्या हिशेबानें किती दिवस गेले होते ते मोजणें शक्य होतें का?

त्या रात्रींच्या वेळीं तलावाच्या काठीं दोघेंही एकमेकांसमोर उभीं राहिलीं होतीं. जिकडे तिकडे निस्तब्धता नांदत होती. त्या निसर्गाच्या उघड्या घरांत, निळया आभाळाच्या छपराखालीं मृणालिनी हेमचन्द्राच्या समोर उभी होती.

भाषेंत काय शब्द नव्हते? बोलायला काय विषय नव्हता? प्रत्येकाच्या मनांत कांहींतरी बोलावें असें येत होतें. भाषेंत शब्दही होते. मग ते बोलत नव्हते कां? डोळेभर पाहून घेण्यासाठीं जिथें मन उन्मत्त झालें होतें, तिथें तोंडांतून शब्द बाहेर फुटणार होता कसा? पुष्कळ पुष्कळ बोलावें असें मनांत येत होतें, पण आधीं काय बोलावें हेंच त्या दोघांपैकीं एकालाही ठरवतां येत

नव्हतें. अशावेळीं मनांतला उद्देश स्पष्ट करील असा अचुक शब्द मनुष्याच्या भाषेंत आहे कुठें ?

तीं दोघेंही एकमेकांच्या तोंडाकडे पहात राहिलीं होतीं. हेमचन्द्रानें मृणालिनीच्या प्रेमपूर्ण मुद्रेकडे पाहिलें, त्यावेळीं हृषिकेशानें केलेल्या आरोपाचा प्रत्यय त्याच्या मनांतून आपोआप दूर झाला. त्या उघड्या ग्रंथाच्या प्रत्येक पानांत पावित्र्य लिहिलेलें होतें. हेमचन्द्रानें तिच्या डोळ्यांकडे पाहिलें—ते प्रेमाश्रूंनी भरून गेलेले डोळे पाहून त्याला वाटलें, हीच का ती दुराचारी ?

आतां हेमचन्द्रानें बोलायला पहिल्यानें सुरवात केली. त्यानें विचारलें, "मृणालिनी, कशी काय आहेस तूं ?"

मृणालिनीच्या तोंडून शब्द बाहेर फुटला नाहीं. अजूनही तिचें चित्त ठिकाणावर आलें नव्हतें. बोलावें असें मनांत येत आहे तोंच पुन्हा डोळे पाण्यानें भरून आले, गळा दाटून आला, तोंडावाटे शब्द बाहेर पडला नाहीं.

हेमचन्द्रानें पुन्हा विचारलें, "कां आली आहेस तूं ?"

तरीही मृणालिनीच्या तोंडून उत्तर बाहेर पडेना. हेमचन्द्रानें तिचा हात धरून तिला पायरीवर बसवलें. तो स्वतः तिच्याजवळ बसला. त्याच्या या प्रेमळ वर्तनामुळें तिच्या मनांतला संकोच दूर झाला.

हळुहळू तिचें मस्तक हेमचन्द्राच्या खांद्यावर कलंडलें, पण मृणालिनीला त्याची जाणीवच झाली नव्हती. ती पुन्हा रडूं लागली. तिच्या डोळ्यांतल्या आसवांनी त्याचें अंग खांद्यापासून छातीपर्यंत भिजून गेलें. मृणालिनीच्या सुखाची परमावधी झाली होती.

हेमचन्द्र पुन्हां बोलूं लागला, "मृणालिनी, मी अपराधी आहें—तुझ्यालेखीं तर मी महान अपराधी आहें. मला क्षमा कर. तुझ्यावर आलेला दुर्वर्तनाचा आरोप ऐकून मी त्याच्यावर विश्वास ठेवला—तसा विश्वास ठेवायला कारणंही घडलीं होतीं—त्यांचं निराकरण करणं तुझ्या हातीं आहे. आतां मी विचारतों त्या प्रश्नांचीं सरळ उत्तरं दे."

हेमचन्द्राच्या खांद्यावरचें मस्तक न उचलतां मृणालिनी म्हणाली, "काय उत्तर देऊं ?"

हेमचन्द्र म्हणाला, "हृषिकेशाचं घर सोडून तूं कां निघालीस ?"

हृषिकेशाचें नांव ऐकून फणा उभारणाऱ्या डिंवचलेल्या नागिणीसारखें तिनें आपलें मस्तक उभारलें आणि म्हटलें, "हृषिकेशानंच मला आपल्या घरांतून घालवून लावलं!"

तें उत्तर हेमचन्द्राला जाणवलें—तो थोडासा साशंक झाला—थोडासा काळजीतही पडला. तितक्यांत मृणालिनीनें पुन्हा आपली मान हेमचन्द्राच्या खांद्यावर टाकली होती. त्या सुखासनावर डोकें टेकण्यांत मृणालिनीला इतका आनंद होता, कीं तो क्षणभराचा दुरावाही तिला सहन झाला नाहीं.

हेमचन्द्रानें विचारलें, "हृषिकेशनं काय म्हणून तुला घराबाहेर घालवून दिलं?"

हेमचन्द्राच्या हृदयाशीं आपलें तोंड लपवून मृणालिनी अगदीं हळुच म्हणाली, "तुम्हाला कसं सांगू? हृषिकेशानं मला घराबाहेर लोटलं तें मी कुलटा म्हणून!"

तें ऐकतांच हेमचन्द्र ताडकन् उठून उभा राहिला. मृणालिनीचें मस्तक त्याच्या हृदयावरून कोसळून पायरीवर आदळलें.

"पापिणी! स्वतःच्या तोंडानं आपला गुन्हा कबूल करतेस?" तोंडांतून हे शब्द बाहेर निघतात न निघतात तोंच हेमचन्द्र तिथून निघूनसुद्धां गेला होता.

वाटेंत त्यालां गिरिजाया भेटली. त्याची ती भीममूर्ति पाहून ती दचकून उभी राहिली. जें घडलें तें सांगणें अवश्य आहे—पण सांगायला लाज वाटते—हेमचन्द्रानें एक लाथ मारून गिरिजायेला रस्त्यांतून दूर केलें. तो म्हणाला, "तूं जिची दूती, तिला मी लाथ मारली असती तर माझे पाय विटाळले असते!" एवढेंच बोलून हेमचन्द्र तिथून चालता झाला.

ज्याच्याठायीं धैर्याचा अभाव असतो, जो उतावीळपणा करतो, रागाच्या भिरभिरींत जो आंधळा बनतो, तो जगांतलीं सारीं सुखें एकजात गमावून बसतो. या उतावीळपणाच्या पायींच वीरश्रेष्ठ द्रोणाचार्यानें स्वतःचें मरण ओढवून आणलें. 'अश्वत्थामा हत' एवढेच शब्द ऐकतांच त्यानें धनुर्बाण खालीं ठेवले. अवश्य ते प्रश्न विचारून त्यानें प्रसंगाचें निराकरण करून घेतलें नाहीं. तसेंच केलें हेमचन्द्रानें—नुसता उतावीळपणा नव्हे, वृथा अभिमान—अनावर क्रोध!

थंड वारा वाहूं लागला होता. उषेची मंगल मूर्ति तलावाच्या तटाजवळच्या जंगलांत उदय पावूं लागली होती. आपलें आदळलेलें मस्तक हातीं धरून मृणालिनी तेव्हांपर्यंत पायरीवर बसून राहिली होती.

गिरिजायेनें विचारलें, "बराच मार लागला का?"

"कसला मार?" मृणालिनी म्हणाली, "कुठं? कुणाला?"

"तुमच्या माथ्याला." गिरिजाया म्हणाली.

"माझ्या माथ्याला मार बसला?" मृणालिनीने बिचुकपणें विचारलें, "मला नाहीं आठवत!"



# चतुर्थ खंड

## —: १ :—

ज्या वेळीं मृणालिनीच्या सुखाची तारका अस्ताला जात होती, त्याच वेळीं गौड देशाचा सौभाग्याचा सूर्यही मावळूं लागला होता. ज्या व्यक्तीला गौड देशाचें रक्षण करण्याचें सामर्थ्य होतें, ती व्यक्ती एकांतात बसून आपल्या जन्मभूमीला बांधून टाकण्यासाठीं कोळ्यासारखें जाळें विणीत होती.

रात्रीच्या वेळीं धर्माधिकारी पशुपती एकांतात बसला होता. त्याचा उजवा हात शांतशील तिथेंच होता. पशुपती त्याची निर्भत्सना करून म्हणाला, "आज तूं जी बातमी दिलीस शांतशील, ती म्हणजे तुझ्या नालायकीचा पुरावा आहे. यापुढं तुझ्यावर कोणतीही कामगिरी सोपवणं मला योग्य वाटत नाहीं."

शांतशील म्हणाला, "असाध्य गोष्ट मला साध्य झाली नाहीं! दुसरं कोणतं-ही काम माझ्यावर सोंपवून माझी परीक्षा घ्या."

पशुपतीनें विचारलें, "सैनिकांना आतां काय सांगितलं आहेस तूं?"

शांतशील म्हणाला, "आमच्या हुकुमाशिवाय कुणीही लढाईला तयार व्हायचं नाहीं असं मी बजावलंय त्यांना."

"प्रांतपाल आणि कोष्टपाल यांना काय सांगितलं आहेस?" पशुपतीनें विचारलें.

शांतशील म्हणाला, "मी त्यांना असं सांगितलंय, कीं लवकरच यवन-सम्राटाकडून करभार घेऊन कांही यवनदूत इकडे येणार आहेत, त्यांना कुणी अडवायचं नाहीं."

"दामोदर पंडितानं मी सांगितलेलं काम बजावलं कीं नाहीं ?" पशुपतीनें विचारलें.

"त्यांनी मोठ्या चतुराईनें तें काम चालवलंय." शांतशील म्हणाला, "एका पुरातन ग्रंथातलं एक पान बदलून त्यांनी त्या जागीं आपण रचलेल्या कविता घुसडून दिल्या आहेत. आज तिसऱ्यां प्रहरीं त्यानीं त्या कविता नेऊन राजाला ऐकवल्यां आणि तोंड भरून माधवाचार्यांची निंदा केली."

पशुपती म्हणाला, "त्या माझ्या कवितेंतून पुढं होणाऱ्या गौडविजेत्याच्या रूपाचं वर्णन तपशिलवार केलंय—तें ऐकल्यावर महाराजांनी कांहीं विशेष चौकशी केली का ?"

"हो, केली तर." शांतशील म्हणाला, "नुकताच मदन सेन काशीक्षेत्रांतून परत आलाय. ती बातमी महाराजांना कळली होती. त्या कवितेंत आगामी गौडविजेत्याचं वर्णन ऐकून महाराजांनी त्याला बोलावणं पाठवलं. मदन सेन आला तेव्हां महाराजांनीं त्याला विचारलं, 'तूं मगध देशांत गेला होतास, त्यावेळीं तिथं यवनराजाचा जो प्रतिनिधी आहे त्याला पाहून आलास काय ?' मदन सेननं 'होय' म्हटलं तेव्हां महाराजांनीं त्याला विचारलं, 'तो दिसायला कसा आहे तें तपशिलवार सांग पाहूं.' मदन सेनानं बख्त्यार खिलजीचं अगदीं यथातथ्य वर्णन करून सांगितलं. त्या कवितेंतही तसंच वर्णन होतं. आतां तो यवन हा गौड देश जिंकणार आणि आपलं राज्य नाहींसं होणार, अशी महाराजांची खात्री झाली."

"त्यानंतर काय झालं ?" पशुपतीनें विचारलें.

"महाराज तेव्हां रडूं लागले." शांतशील म्हणाला, "ते म्हणाले, 'मी आतां म्हातारा झालोंय. मी काय करणार ? पोराबाळांसकट यवनांच्या हातून मरण येणार यांत कांहीं संशय नाहीं.' त्यावेळीं दामोदर पंडितानं आपण शिकवल्याप्रमाणें सांगितलं, 'महाराज, याला एक उपाय आहे. संधी आहे तोंपर्यंत आपण सहपरिवार तीर्थयात्रेला निघा. राजकार्याचा सारा भार धर्माधिकारी पशुपती यांच्यावर सोंपवा. तसं केलं तर निदान आपला प्राण तरी वाचेल. बरं, शास्त्रांतलं भविष्य खोटं ठरलं तर आपलं राज्य पुन्हा ताब्यांत घ्यायला आपण मोकळे आहांतच.' हा सल्ला महाराजांना पटला. त्यांनी गलबत तयार

ठेवायचा हुकूम सोडला आहे. लवकरच ते सहपरिवार तीर्थयात्रेसाठीं निघणार आहेत."

"शाबास दामोदर!" पशुपती म्हणाला, "आणि तुझीही शाबास! आतां माझे बेत तडीला जायला अडचण येणार नाहीं. स्वतंत्र राजा झालों नाहीं, तरी निदान यवनराजाचा प्रतिनिधी म्हणून तरी या राज्याचा मालक होईन! सारं कांहीं माझ्या मनासारखं झालं, कीं तुम्हा लोकांची संभावना योग्य तें बक्षिस देऊन करीन. त्यांत अंतर होणार नाहीं. कळलं? आतां तूं जा. उद्यां सकाळींच महाराजांच्या तीर्थयात्रेसाठीं नौका तयार ठेवायची खबरदारी घ्या."

•••

## —: २ :—

पशुपती एका मोठ्या राजवाड्यांत भरपूर नोकर चाकर घेऊन रहात होता खरा, पण तें घर जंगलापेक्षांही ओसाड वाटत असे. घराला उजाळा यायचा तो बायको, मुलेंबाळें वगैरे परिवाराचा—यांपैकीं त्याच्या घरांत कुणीच नव्हतें. शांतशीलबरोबर झालेल्या भाषणानंतर पशुपतीला ही परिस्थिती जाणवली आणि तो आपल्याशींच म्हणाला, "एवढ्या दिवसांनंतर हे अंधारी घर उजळून उठेल. जगदंबेची कृपा झाली तर मनोरमा येईल आणि या घरांतला हा काळोख घालवील."

झोंपी जायच्यापूर्वी पशुपती रोज नियमानें प्रणाम करण्यासाठीं मंदिरांत जात असे, त्याप्रमाणें तो देवीमंदिरांत आला, तों तिथें मनोरमा येऊन बसलेली त्याला दिसली.

पशुपतीनें विचारलें, "केव्हां आलीस मनोरमा?"

पूजेचीं शिल्लक राहिलेलीं फुलें घेऊन मनोरमा फुलांची बिनसुताची माळा गुंफित होती. तिनें त्याला उत्तर दिलें नाहीं. पशुपती म्हणाला, "बोल ना माझ्याबरोबर! तूं इथं असलीस म्हणजे तेव्हढ्या वेळांत मी माझ्या साऱ्या यातना विसरून जातों."

मनोरमेनें वर नजर करून त्याच्याकडे पाहून म्हटलें, "मी कांहीं तरी बोलायला आलें होतें, पण आतां तें मला आठवत नाहीं."

" तें आठवेपर्यंत मी इथं वाट पहातों. " असें म्हणून पशुपती तिथें बसला आणि मनोरमा माळा गुंफूं लागली.

थोड्या वेळानें पशुपती म्हणाला, " मलाही कांहीं बोलायचं आहे. जरा लक्ष देऊन ऐक !—एवढं वय होईपर्यंत मी केवळ विद्या संपादन केली, राजकाज पाहिलं, संपत्ति मिळवली. केला नाहीं काय तो संसार. लग्न करावं असं मला केव्हां वाटलंच नाहीं, पण तुला पाहिल्यापासून तूं माझी कशी होशील एवढ्या एकाच गोष्टीकडे माझं लक्ष लागलंय. देवीची कृपा झाली तर चार दोन दिवसांतच मला राज्यलाभ होईल अन् मी तुझ्याशीं विवाह करीन. या अधिकाराच्या जोरावर विधवाविवाहाला होणारा विरोध मी हाणून पाडीन ! पण दुसरी अडचण आहे ती ही, कीं तूं आहेस कुलीन कन्या, जनार्दन शर्मा आहे कुलीनश्रेष्ठ आणि मी आहें श्रोत्रीय !—" मनोरमेनें त्याचें भाषण ऐकलें कीं काय याची शंकाच होती. तिची ती उपेक्षा पाहून तो साशंक झाला आणि म्हणाला, " पण कुलरीती म्हणजे कांहीं शास्त्रमूलक नव्हे. तो रूढाचार आहे. कुलनाशानं कांहीं जातिभ्रंश होत नाहीं. त्यांच्या नकळत जर मी तुझ्याशीं लग्न केलं तर काय हरकत आहे ? मात्र तुझी सम्मती हवी. "

मनोरमेनें यावर उत्तर दिलें नाहीं. शेजारीं एक काळें मांजर बसलें होतें, त्याच्या गळ्यांत तिनें ती त्रिनसुताची माळ घातली. त्या मांजरानें मान हालवतांच ती माळ सुटून गेली, तेव्हां माथ्याचे केस सोडून त्यांतल्या सुतानें ती माळ पुन्हा गुंफूं लागली.

तिनें उत्तर न दिल्यामुळें पशुपती स्तब्ध राहिला होता. माळ गुंफित असतांना तिच्या नाजुक बोटांची हालचाल तो मुग्ध होऊन पहात होता.

●●●

## —: ३ :—

**मनोरमेनें** उत्तर द्यावें म्हणून पशुपतीनें बरेच प्रयत्न केले पण ते फलद्रूप झाले नाहींत. शेवटीं तो म्हणाला, " फार रात्र झाली. मी आतां झोंपायला जातें.

"जा तर!" असें म्हणून मनोरमा माळ गुंफित राहिली. पशुपती गेला नाहीं. तो नुसता पहात राहिला होता. मनोरमेला भय दाखवण्याच्या उद्देशानें पशुपती म्हणाला, "मनोरमे, इतक्यांत जर यवन आले तर तूं कुठं जाशील?"

माळेवर नजर ठेवून मनोरमा म्हणाली, "मी घरींच राहीन."

"घरीं तुझं रक्षण कोण करील?"

"कोण जाणे! निरुपाय!"

"तूं काय सांगायला आली होतीस मला?"

"मी देवीला नमस्कार करायला आलें होतें."

पशुपती अस्वस्थ झाला. तो म्हणाला, "मी काय म्हणतों तें एकदां ऐकून घे. माझ्याशीं लग्न करणार आहेस कीं नाहीं तें आजच सांगून टाक."

गुम्फलेली माळा मनोरमेनें मांजराच्या गळ्यांत घातली. मांजर बिचकलें आणि गळ्यांतली माळा फेंकून द्यायचा प्रयत्न करूं लागलें. पशुपतीनें त्या मांजराला एक चापट मारली त्यासरशीं तें माळा झुगारून शेपटी वर करून पळून गेलें. मनोरमेनें ती माळा उचलली आणि दांतांनीं ओठ चावीत ती पशुपतीच्या मस्तकावर ठेवली.

मांजराच्या गळ्यांतली माळ आपल्या मस्तकावर ठेवल्याचें पाहून पशुपतीला राग आला. दांत ओठ चावून हंसत असलेल्या मनोरमेचें अनुपम लावण्य पाहून त्याचें मस्तक भिरभिरलें. दोन्ही हात पसरून तिला मिठी मारण्यासाठीं तो पुढें सरसावला त्यासरशीं ती एक उडी मारून दूर गेली.

पशुपती ओशाळला. मनोरमेची मुद्रा आतां बदलली होती. ती आतां मुग्ध बालिका राहिली नव्हती. कोणत्याही प्रौढेला साजेल अशा गंभीर मुद्रेनें ती म्हणाली, "पशुपती, केशवाची मुलगी कुठं आहे?"

पशुपती म्हणाला, "केशवाची मुलगी कुठं आहे तें मला माहीत नाहीं अन् मला ती माहितीही नको आहे."

"केशवाची मुलगी कुठं आहे तें मला माहीत आहे." मनोरमा म्हणाली, "सांगूं?—" पशुपती थक्क होऊन तिच्याकडे पहात होता त्यावेळीं ती म्हणाली, "केशवाची मुलगी अल्पवयांत विधवा होऊन नवऱ्याबरोबर सहगमन करील, असं भविष्य एका ज्योतिषानं वर्तवलं होतं. थोड्याच काळांत आपली

मुलगी हातची जाईल या भीतीनं तो भ्याला. वेळींच मुलीचं लग्न झालं पाहिजे म्हणून त्यानं तिचं लग्न केलं आणि भविष्य चुकवायच्या उद्देशानं लग्नाच्या रात्रींच तो मुलीला घेऊन प्रयागला पळाला. नवरा अकालीं मरायचा असेल तर ती बातमी मुलीच्या कानीं येऊं नये म्हणून त्यानं ही खबरदारी घेतली होती. थोड्या दिवसांनीं तो मृत्यू पावला. तिची आई आधींच स्वर्गवासी झालेली होती. मरायच्या पूर्वी केशवानं हैमवतीला आपल्या आचार्यांच्या हातीं सोपवली आणि म्हटलं, ' या मुलीचं आपण पालनपोषण करा. हिच्या नवऱ्याचं नांव आहे पशुपती—पण तें हिला केव्हांच सांगूं नका—तसंच हैमवती त्याची पत्नी आहे हें पशुपतीलाही कळूं देऊं नका. '

" आतां कुठं आहे ती ? " पशुपतीनें विचारलें.

" मीच ती केशवची मुलगी ! " मनोरमा म्हणाली, " जनार्दन शर्मा हेच केशवचे आचार्य. "

पशुपतीला एकदम धक्का बसला. त्याचें मस्तक भिरभिरूं लागलें. कांहीं न बोलतां त्यानें देवीच्या मूर्तीसमोर साष्टांग नमस्कार घातला. तो लगेच वर उठला आणि मनोरमेला हृदयाशीं कवटाळण्यासाठीं पुढें सरसावला तेव्हां ती पूर्वीप्रमाणेंच एकदम दूर झाली. ती म्हणाली, " यावेळीं नाहीं—आणखीही सांगायचं आहे. "

पशुपती कळवळून म्हणाला, " मनोरमे ! चांडाळणी ! इतके दिवस मला काळोखांत कां ठेवलंस ? "

" कां म्हणजे ? माझं सांगणं तुम्हाला खरं वाटलं असतं का ? "

" मी कधींतरी तुझ्यावर अविश्वास दाखवला होता का ? अन् तशीच शंका आली असती तर मी जनार्दन शर्म्याला विचारलं नसतं का ? "

" त्यांनी तें सांगितलं नसतं. " मनोरमा म्हणाली, " केशवनं त्यांना शपथ घातली होती. "

" मग तुला कसं सांगितलं त्यानं ? "

" मला हें त्यानीं सांगितलं नाहीं, " मनोरमा म्हणाली, " एके दिवशीं आचार्य आपल्या पत्नीबरोबर एकांतांत बोलत होते त्यावेळीं मी तें अचानक ऐकलं ! "

"कांहीं हरकत नाहीं," पशुपती म्हणाला, "जें व्हायचं होतं तें होऊन गेलं. माझं हरवलेलं रत्न मला पुन्हा मिळालंय तें मी आतां हातचं सोडून देणार नाहीं. यापुढं मी तुला या घरांतून बाहेर जाऊं देणार नाहीं."

"हें घर सोडून मला गेलंच पाहिजे." मनोरमा म्हणाली, "मी जें कांहीं सांगायला आलें होतें तें आतां ऐका—हें घर सोडा. राज्यलाभाची दुराशा सोडा. धन्याचं अहित करण्याचे प्रयत्न सोडा. हा देश सोडून चला. आपण काशीक्षेत्रीं जाऊं. तिथं मी तुमची सेवा करून जन्माचं सार्थक करीन. हें जर कबूल असेल तरच माझी भक्ती अचल राहील—नाहींतर—"

"नाहींतर काय?" पशुपतीनें विचारलें.

देवीच्या प्रतिमेसमोर हात जोडून उभी राहून डोळ्यांत पाणी आणून गहिंवरल्या आवाजानें मनोरमा म्हणाली, "नाहींतर—देवी समक्ष शपथेवर सांगतें, तुमची माझी हीच शेवटची भेट!"

तें ऐकून पशुपतीही देवीसमोर हात जोडून उभा राहिला आणि म्हणाला, "मनोरमा, मीही शपथ करतों—या कुडींत प्राण असेपर्यंत मी तुला या माझ्या घरांतून जाऊं देणार नाहीं. ज्या मार्गावर मी पाऊल टाकलं आहे तिथून आतां मला हटतां येत नाहीं. तसं करतां आलं असतं तर सर्वस्वाचा त्याग करून मी तुझ्यासह काशीवास केला असता. आतां मी इतका पुढं गेलों आहें, कीं मला आतां मागं फिरतां येत नाहीं. जें व्हायचं तें होऊन गेलं आहे, पण त्यासाठीं काय मी माझ्या जीवनांतल्या परमसुखाला मुकावं? तूं माझी पत्नी आहेस—माझ्या नशिबीं कांहीही असो, मी तुला माझी गृहिणी करणार—क्षणभर वाट पहा—मी लवकर परत येतों." असें म्हणून तो निघून गेला.

मनोरमेला शंका आली. कांहीं वेळ विचार करीत ती तिथेंच राहिली होती. थोड्याच वेळांत पशुपती परत आला आणि म्हणाला, "आज तुला मी कांहीं-केल्या जाऊं देणार नाहीं. सारीं दारं मी आतां बंद करून टाकलीं आहेत."

मनोरमा सांपळ्यांत सांपडली.

●●●

-: ४ :-

एक प्रहर दिवस उलटला होता. कुणीतरी अपरिचित जातीचे सत्तर घोडेस्वार राजरस्त्यांतून राजभवनाकडे जात असलेले पाहून नगरवासी लोक आश्चर्यचकित झाले. कुणीतरी प्रश्न केला आणि त्याला असेंच कुणीतरी उत्तर दिलें—' हे यवन राजाचे दूत. '

ते सत्तर घोडेस्वार राजद्वारीं हजर झाले. म्हाताऱ्या राजाच्या ढिलाईमुळें आणि पशुपतीच्या कौशल्याच्या जोरावर राजपुरी रक्षकहीन होती. राजसत्तेचें विसर्जन झालें होतें. नगरांत नुसतें नागरिक तेवढे होते. राजद्वारावर असलेल्या मूठभर द्वारपालांपैकीं एकानें त्या यवनांना विचारलें, " इथं कशाला आलां आहां तुम्ही ? "

यवनांनीं उत्तर दिलें, " आम्ही यवनराजाच्या प्रतिनिधीचे दूत—गौड राजाला भेटायला आलों आहों. "

द्वारपाल म्हणाला, " गौडेश्वर यावेळीं अंतःपुरांत आहेत. यावेळीं त्यांची भेट होणार नाहीं. "

द्वारपालाच्या अडथळ्याला न जुमानतां उघड्या दरवाजांतून ते यवन आंत प्रवेश करूं लागले तेव्हां द्वारपालांनी त्यांच्यावर हल्ला केला. दोघेही लढूं लागले. मूठभर द्वारपालांची विल्हेवाट लावायला यवनांना कठीण गेलें नाहीं. त्यांतला एक ठेंगणा यवन होता तो ओरडून म्हणाला, " जिथं जो सांपडेल त्याची कत्तल करा. म्हाताऱ्या राजाचा जीव घ्या ! "

ते यवन विजेच्या वेगानें गावांत घुसले आणि जो सांपडेल त्याचा शिरच्छेद करूं लागले. गांवांत एकच हलकल्लोळ झाला. राजाच्या कांनीं तो आरडाओरडा गेला त्यावेळीं तो भोजन करायला बसला होता. त्यानें विचारलें, " ही कसली गडबड आहे ? यवन आले आहेत का ? "

कुणीतरी उत्तर दिलें, " गांवांतल्या साऱ्या लोकांची कत्तल करून यवन आपला जीव घेण्यासाठीं येत आहेत. "

राजानें तोंडाशीं नेलेला घांस खालीं पडला. तो थरथर कांपत होता. मूर्च्छा येऊन तो खालीं पडणार असें पाहून जवळच असलेल्या राणीनें म्हटलें,

" घाबरूं नका. होडी तयार आहे. चला. मागल्या दरवाजानं जाऊन आपण सोनगांव गांठूं. "

राणीनें राजाला तसाच उष्टया हातानें ओढून नेला आणि मागल्या दारानें ते सोनगांवकडे निघाले. या दुबळ्या आणि राजकुलाला कलंक झालेल्या गौड राजाबरोबरच गौड देशची राजलक्ष्मी बाहेर चालती झाली.

सोळा सहकारी घेऊन माकडतोंड्या बख्त्यार खिलजी गौडेश्वराची राजधानी काबिज करून विजयी झाला.

साठ वर्षांनंतर यवनांचा इतिहासलेखक मिन्-हाज् उद्दिन् यानें अशी बखर करून ठेवली आहे. यांतलें खरें किती आणि खोटें किती तें कोण सांगणार ? मनुष्यानें काढलेल्या चित्रांत सिंह नामोहरम झाल्याचें दिसतें, पण तें चित्र सिंहानें काढलेलें असतें तर काय झालें असतें ? माणूस उंदरासारखा दिसला असता त्या चित्रांत ! "

मंदभागिनी वंगभूमी आधींच दुबळी--आणि तिचा चित्रफलक वैऱ्याच्या हातीं !

●●●

## —: ५ :—

गौडेश्वराचें राज्य काबीज केल्यावर बख्त्यार खिलजीनें दूत पाठवून धर्माधिकारी पशुपतीला आपल्या भेटीला बोलावलें. देवीला प्रणाम करून चिडलेल्या मनोरमेचा निरोप घेऊन क्वचित् उल्हासित तर क्वचित् शंकित चित्तानें बख्त्यार खिलजीनें त्याचें स्वागत केलें. पशुपतीचे पाय त्याच्या भाईबंदांच्या रक्तांत भिजले होते, त्यामुळें त्याचें तोंड बंद झालें होतें. पशुपतीच्या मनांतला आशय ओळखून बख्त्यार खिलजी म्हणाला, " पंडितवर, राजसिंहासनावर चढायच्या वाटेला कांहीं फुलांची पखरण केलेली नसते ! या वाटेनं जायचं म्हणजे भाईबंदांची मुंडकीं तुडवावीं लागतात पायाखालीं ! "

" तें खरं आहे." पशुपती म्हणाला, " जे विरोध करतील त्यांचा वध केलाच पाहिजे. पण यांतल्या कुणी हातसुद्धां वर उचलला नव्हता ! "

बख्त्यार म्हणाला, " रक्ताचे पाट पाहून आपलं वचन विसरलां वाटतं ?"

" मी कबूल केलं आहे तसाच मी वागेन. अन् आपणही आपलं वचन पाळाल असं मी समजतों. " पशुपती म्हणाला.

" अर्थात् पाळीन. " बखत्यार म्हणाला, " पण माझं एक मागणं आहे. कुतुबुद्दीननं गौड देशचा कारभार आपल्या हातीं दिला आहे. आपण आज-वंगदेशाचे राजप्रतिनिधी झालां आहां--पण यवनसम्राटाचा एक संकल्प आहे--इस्लामधर्मीयाखेरीज कुणालाही राज्यकार्योचा भार सोंपवायचा नाहीं. आपल्याला इस्लामधर्माचा अंगिकार करणं भाग आहे ! "

पशुपतीची गाळण उडाली. तो म्हणाला, " संधी करायच्यावेळीं हा प्रश्न निघाला नव्हता. "

" नसेलही कदाचित् ! " बख्त्यार म्हणाला, " कदाचित् चुकून तो उल्लेख राहिला असेल. आपण बुद्धिमान आहां. आपल्याला हें सांगायला नको. मुसलमानांनीं बंगाल देश काबीज केल्यावर ते हिंदूंच्या हातीं राज्य कसं देतील ? म्हणूनच आपण आमचा धर्म स्वीकारला पाहिजे. "

अभिमानानें छाती फुलवून पशुपती म्हणाला, " यवन सम्राटाच्या साऱ्या साम्राज्यासाठीं देखील सनातनधर्माचा त्याग करून मी नरकाची वाट पत्कर-णार नाहीं. "

" आपला हा भ्रम आहे. " बखत्यार म्हणाला, " सनातन धर्म म्हणजे भूताखेतांची पूजा. कुराणप्रणीत धर्म म्हणजेच खरा धर्म. इस्लाम धर्माचा स्वीकार करून इहकाल आणि परकालच्या मंगल साधनाचा मार्ग पत्करा. "

यवनाचा डाव आतां पशुपतीच्या लक्षांत आला. सामदामानें आपण ऐकलें नाहीं तर जबरदस्तीनें तो आपलें म्हणणें खरें करील--अर्थात् कपटाला कप-टानेंच उत्तर दिलें पाहिजे असा विचार करून तो म्हणाला. " जशी आज्ञा ! मी आपला प्रस्ताव कबूल करतों. "

बख्त्यार खिलजीला त्याचा उद्देश कळला. तो पशुपतीपेक्षां अधिक चतुर नसतां तर इतक्या थोड्या वेळांत आणि श्रमांत त्यानें गौड देश जिंकला नसता. वंगभूमीच्या कपाळीं हेंच लिहिलेलें आहे—ही भूमी युद्धांत जिंकली जाणार नाहीं. चातुर्याच्या बळावरच जिंकली जाणार ! याचा दुसरा पुरावा दिला तो कारस्थानी क्लाइव्ह साहेबांनीं.

बख्त्यार म्हणाला, " फार उत्तम. आज आमचा भाग्याचा दिवस आहे. आतां उशीर कशाला? आमचे काजी हजर आहेत, याच क्षणाला ते आपल्याला इस्लामची दीक्षा देतील."

पशुपती मोठ्या पेचांत सांपडला. तो म्हणाला, " मला थोडा अवसर द्या. मी माझ्या आप्तेष्टांना घेऊन येतों -- सहकुटुंब सहपरिवार दिक्षा घेतों."

बख्त्यार म्हणाला, " मीच माणसं पाठवून त्यांना बोलावून घेतों. आपण या पहारेकऱ्याबरोबर जाऊन थोडी विश्रांती घ्या."

पहारेकऱ्यानें येऊन पशुपतीला पकडलें. पशुपती रागानें भडकून म्हणाला, " हें काय चाललं आहे! मला कैद करतांहां का आपण?"

" जवळ जवळ तसंच!" बख्त्यार म्हणाला.

पशुपती आपल्याच राज्यांत कैद होऊन पडला. कोळ्याचें जाळें तुटलें— त्या जाळ्यांत तो स्वतःच अडकून पडला. कोळी नुसतें जाळें विणतो. तो युद्ध करीत नाहीं!

त्याच दिवशीं रात्रीं महावनांतून वीस हजार सैन्य आलें आणि त्यांनीं सारें नवद्वीप घेरून टाकलें. गौड देश जिंकला गेला. त्या दिवशीं अस्ताला गेलेला सूर्य पुन्हा उगवला नाहीं. तो पुन्हा उगवणार नाहींच का?

अस्तामागून उदय व्हायचा हाच निसर्गाचा नियम!

●●●

## —: ६ :—

पशुपती जोंपर्यंत आपल्या वाड्यांत होता तोंपर्यंत त्यानें मनोरमेला आपल्या नजरेसमोर ठेवलें होतें. ज्यावेळीं तो यवनांच्या भेटीला गेला त्यावेळीं त्यानें घराचीं सर्व दारें बंद करून शांतशीलला घरावर नजर ठेवायला सांगितलें होतें. पशुपती जातांक्षणींच मनोरमा पळून जायच्या प्रयत्नाला लागली. तिनें सर्व धुंडाळून पाहिलें, पण पळायला कुठेंच वाट सांपडली नाहीं. घराच्या छपराला कांहीं गवाक्षें होतीं पण तिथपर्यंत पोंचणें दुष्कर होतें. माणसाला त्या गवाक्षाच्या वाटेनें बाहेर पडणें शक्य नव्हतें. मनोरमा बेफाट झाली होती—तिनें त्या गवाक्षाच्या वाटेनेंच पळून जायचें ठरवलें.

पशुपती गेल्यानंतर थोड्या वेळानें मनोरमा त्याच्या शेजघरांत आली. ती त्याच्या पलंगावर चढली, तेव्हां गवाक्षाला तिचे हात पोंचले. त्या गवाक्षाच्या दारांतून पहिल्यानें तिने दोन हात, नंतर मस्तक, नंतर छातीपर्यंतचा भाग बाहेर काढून पाहिला. बागेतल्या एका आंब्याची डहाळी त्या गवाक्षापर्यंत येऊन पोंचली होती. ती डहाळी हातानें पकडून मोठ्या कष्टानें ती गवाक्षाबाहेर आली आणि त्या डहाळीला लोंबकळूं लागली. ती कोंवळी डहाळी तिच्या वजनाच्या भारानें जेव्हां खालीं वाकली तेव्हां तिचे पाय जमिनीपासून जवळ-जवळ आले. डहाळीचे हात सोडतांक्षणीच ती जमिनीवर पडली.

एक क्षणभर सुद्धां वाट न पाहतां ती जनार्दनाच्या घराकडे पळत सुटली.

● ● ●

—: ७ :—

विजयानें धुंद झालेली यवनसेना त्या रात्रीं नवद्वीप नगरांत धुडगूस घालीत होती. कितीतरी स्वार, कितीतरी पायदळ, कितीतरी समशेर-धारी, भालाईत, धनुकीलोक साऱ्या शहरभर पसरले होते. त्यांच्या भीतीनें नागरीक लोक दारें बंद करून देवाचें नांव घेत लपून राहिले होते. राजरस्त्यांत संचार करणारे यवन शिपाई जो समोर सांपडेल त्याचा जीव घेत होते. घराघरांतून जबरदस्तीनें शिरून जो सांपडेल त्याची कत्तल करीत होते.

जिकडे तिकडे हलकल्लोळ माजला होता. माणसांच्या मुंडक्यांचा आणि तुटलेल्या अवयवांचा रस्त्यारस्त्यांतून खच पडला होता. ब्राह्मणाच्या गळ्यांतील यज्ञोपवीत काढून तें घोड्याच्या गळ्यांत घालण्यांत येत होतें. देवमंदिरांतील शालिग्राम शिला लाथेखालीं तुडवली जात होती. जिकडे तिकडे रडारड ऐकूं येत होती. कुणी हांका फोडीत होते, कुणी विव्हळत होते, कुणी मरतां मरतां आपल्या आप्तांचा शेवटचा निरोप घेत होते.

यवनांच्या निःपातासाठीं माधवाचार्यांनीं ज्या वीर पुरुषाला नवद्वीपांत आणला होता तो यावेळीं कुठं होता ? तो लढाईत सामील झाला नव्हता. एवढ्या प्रचंड सैन्याला तो एकटा तोंड कसें देणार होता ?

हेमचन्द्र आपल्या शेजघरांत बिछान्यावर पडला होता. गावांतला कोलाहल त्याच्या कानीं गेला तेव्हां त्यानें दिग्विजयाला विचारलें. दिग्विजय म्हणाला, " यवनसेनेनं नगर काबीज केलं आहे. "

हेमचन्द्र आश्चर्यचकित झाला. बख्त्यार खिलजीनें नवद्वीप काबीज केल्याची सारी हकीकत दिग्विजयानें त्याला सांगितली त्यावेळीं तो म्हणाला, " नागरिक काय करताहेत ? "

" कांहीं पळताहेत तर कांहीं यवनांच्या हातीं सांपडून मरताहेत. " दिग्विजय म्हणाला.

" आणि गौड देशचं सैन्य काय करतं आहे ? " त्यानें विचारलें.

" कुणासाठीं लढणार तें ? " दिग्विजय म्हणाला, " राजा तर पळून गेला. आतां जिकडे वाट फुटेल तिकडे जो तो पळतो आहे. "

हेमचन्द्र म्हणाला, " माझा घोडा तयार कर. "

" कुठं जाणार ? " दिग्विजयानें विचारलें.

" नगरांत ! " हेमचन्द्र म्हणाला.

" एकटेच ? " दिग्वियानें विचारलें.

हेमचन्द्रानें त्याच्यावर डोळे वटारले तेव्हां भिऊन त्यानें घोडा तयार करून आणला.

घोड्यावर स्वार होऊन हातांत भाला घेऊन हेमचन्द्र दौड करीत निघाला. यवन लोक लढाई करीत नव्हते. नुसती लूट करीत होते. त्यांच्या समोर जाणें म्हणजे निष्कारण मरण ओढवून घेण्यासारखें होतें. हेमचन्द्र निराश झाला. तो युद्धाच्या आशेनें आला होता, पण युद्ध केल्याशिवायच यवन विजयी झाले होते. त्याला वाटलें, " झाडाचं एकेक पान तोडलं म्हणजे कांहीं सारं अरण्य पालथं घालतां येत नाहीं ! एकेक यवन मारून काय होणार ? यावेळीं यवनांना मारण्यापेक्षां गांवच्या लोकांना मदत करणं चांगलं ! "

हेमचन्द्र त्या कामाला लागला पण त्यांतही त्याला यश आलें नाहीं. तो कुणाला मदत करायला गेला तर दोघेजण त्याच्यावर चाल करून येत आणि तो लढाईत गुंतला आहे अशी संधी साधून तिसरा जाऊन लूटमार करी.

त्यामुळें त्याचा नाइलाज झाला होता. तो आपल्या परीनें शक्य तितकी मदत करीत होता.

अशा रीतीनें काम करीत असतांना शेजारच्या घरांतून आलेली आरोळी त्याच्या कानीं आली. हेमचंद्र घरांत घुसला. घरांत कुणी यवन नव्हता. सारी चीजवस्त उध्वस्त करून यवन निघून गेले होते. घर अगदीं खालीं झालें होतें. तिथें एक ब्राह्मण जखमी होऊन पडला होता. त्याचीच आरोळी हेमचन्द्राच्या कानीं गेली होती.

हेमचन्द्र त्याच्या जवळ गेला तेव्हां तो यवन आहे अशी कल्पना करून तो ब्राम्हण ओरडला, " ये ये—मार मला—एकदां जीव घे माझा—ठार कर. माझं मुंडकं कापून त्या राक्षसिणीला दे. आँः ! पाणी ! पाणी ! कुणीतरी पाणी द्या मला ! "

हेमचन्द्रानें विचारलें, " इथं पाणी कुठं आहे ? "

विव्हळत तो ब्राह्मण म्हणाला, " माहीत नाहीं—आठवत नाहीं—पाणी ! पाणी ! पिशाची !—त्या चांडाळणीच्या पायीं माझा प्राण गेला. "

हेमचन्द्रानें सारें घर धुंडाळून पाणी आणून त्याच्या पुढें केलें त्यावेळीं तो म्हणाला, " नाहीं—नाहीं. यवनाच्या हातचं पाणी मी ब्राह्मण कसं घेईन ? "

हेमचन्द्र म्हणाला, " मी यवन नाहीं, मी हिंदू आहें. माझ्या बोलीवरून नाहीं का तुला कळत ? " तें ऐकल्यावर ब्राह्मण पाणी प्याला. हेमचन्द्र म्हणाला, " आतां तुझ्यासाठीं मी काय करूं ? तुझ्या नात्यागोत्याचं कुणी आहे का ? कुणाला बोलावून आणूं ? "

" खूप आहेत ! " तो ब्राह्मण म्हणाला, " आणखी एक राक्षसी आहे. ती राक्षसी—तिला सांगा—सांगा—माझा अप—माझ्या अपराधाची शिक्षा मला मिळाली ! "

" कुणाला सांगूं ? " हेमचन्द्र म्हणाला.

" त्या पिशाचीला ! " तो ब्राह्मण विव्हळत म्हणाला, " त्या चांडाळणीला ! माहीत नाहीं ती ?—ती पिशाची मृणालिनी ! ती चांडाळीण—" ब्राह्मण थकत जाऊन अधिकच विव्हळूं लागला. मृणालिनीचें नांव ऐकून हेमचन्द्र दचकला. त्यानें विचारलें, " मृणालिनी तुझी कोण ? काय केलं तिनें तुला ? "

" तिनं कांहीं केलं नाहीं मला!—मी मात्र—मी—मी तिची दुर्दशा केली. त्याची शिक्षा झाली मला—आतां नाहीं बोलवत!—पाणी!—पाणी द्या!—"

हेमचन्द्रानें त्याला पुन्हा पाणी पाजलें आणि विचारलें, " नांव काय तुझं ?"

ब्राह्मण म्हणाला, " व्योमकेश ! "

हेमचन्द्राच्या डोळ्यांतून आगीच्या ठिणग्या उडूं लागल्या. दांत ओठ खात असतांना त्याच्या मुठी वळवळत होत्या. मनाला लगाम घालून त्यानें विचारलें, " तूं रहातोस कुठं ? "

तो विव्हळत म्हणाला, " गौड—गौड माहीत आहे ना तुम्हाला ? मृणालिनी रहात होती आमच्या घरीं—मृणालिनी भारी निर्दय—ढुंकून सुद्धां पहात नव्हती माझ्याकडे—लाथ मारीत होती मला—रागारागानं मी माझ्या बापाकडे तिची नालस्ती केली—तिच्यावर खोटा आळ घेतला—तिचा दोष नव्हता—बाबांनी तिला घराबाहेर हांकून दिलं—राक्षसी—राक्षसी आम्हाला सोडून गेली."

" तूं शिव्या कां देतो आहेस तिला ? " हेमचन्द्रानें विचारलें.

ब्राह्मण विव्हळत विव्हळत म्हणालाला, " कां ?—कां शिव्या दिल्या मी ? तिच्यासाठीं मी जीव धरून राहिलों होतों. ती माझ्याकडे ढुंकून सुद्धां पाहीना—ती निघून गेली—मी घरदार सोडलं—देशोदेशीं हिंडत होतों—कुठं जायचं ठेवलं नाहीं मी !—गिरिजाया—ती भिकारीण—तिच्या आईनं सांगितलं नव द्वीपांत गेली—नवद्वीपांत आलों—पत्ता नाहीं ! यवनानीं—यवनांच्या हातीं मरतों आहें—त्या राक्षसीच्या पायीं मरतों आहें.—भेटली तर सांगा—माझ्या पापाचं फळ मला मिळालं.—तिला सांगा—"

व्योमकेशाची वाचा बंद झाली. बोलण्याच्या श्रमामुळें तो थकला. त्यानें डोळे मिटले. त्याचें तोंड वेडेंवाकडें होऊं लागलें. त्याचा प्राण निघून गेला.

त्यानंतर हेमचन्द्र तिथें थांबला नाहीं. त्यानें यवनांचा नाद सोडला आणि त्या दंगलींतून कशीबशी वाट काढून त्यानें घराचा रस्ता सुधारला.

• • •

## —: ८ :—

हेमचन्द्र मृणालिनीला लोटून गेल्यापासून ती त्या पायऱ्यांवरच पडून राहिली होती. तिला जायला आतां कुठेंच जागा नव्हती. पहांट होत आली होती. गिरिजायेनें तिला बरेंच विचारून पाहिलें पण तिला कांहींच उत्तर न देतां ती मान खालीं घालून बसली होती. स्नान भोजनाची वेळ झाली, त्यावेळीं गिरिजायेनें तिला पाण्यांत उतरायला लावून स्नान घातलें, पण ओलेत्यानें ती तिथेंच बसून राहिली. स्वतः गिरिजायेला भूक लागली होती, पण मृणालिनी तिथून उठेना तेव्हां पुन्हा पुन्हा तिला विचारणेंही तिला शक्य झालें नाहीं. शेजारच्या जंगलांतून गिरिजायेनें कांहीं फळेंमुळें गोळा करून आणलीं पण मृणालिनीनें त्यांना हात लावून तीं दूर लोटलीं.

दुपार झाली, सूर्य पश्चिमेला गेला, संध्याकाळ झाली, तरीही मृणालिनी घरीं जायला तयार असलेली दिसेना, गिरिजाया अस्वस्थ झाली होती. गेल्या रात्रीं तिला जाग्रण घडलें होतें. शेजारच्या झाडांच्या पानांच्या फांद्या आणून तिनें तळ्याच्या घाटावरच झोंपायची तयारी केली. मृणालिनीनें तिला घरीं जायला सांगितलें. मृणालिनीला घेतल्याशिवाय गिरिजाया जायला तयार नव्हती. ती म्हणाली, "तूं येईपर्यंत मी वाट पाहीन. बोलून चालून मी भिकारीण. पाल्यापाचोळ्यावर झोंपलें म्हणून काय बिघडलं? मी म्हणतें, आतां राजपुत्राचा संबंध कायमचा संपला, मग या कार्तिकाच्या थंडींत कुडकुडत पडायचं कशाला?"

मृणालिनी म्हणाली, "त्याचा माझा संबंध केव्हांही तुटायचा नाहीं. कालपर्यंत मी हेमचन्द्रांची दासी होतें—आजही त्यांचीच दासी आहें!"

गिरिजाया चिडून म्हणाली, "असल्या अविचारी माणसाच्या काय तुम्हीं दासी!—मग मीही चाललें! आतां इथं माझं कांहीं काम नाहीं. असल्या चांडाळाचा—"

"ते राजपुत्र आहेत—माझे पती आहेत!" मृणालिनी म्हणाली, "त्यांना चांडाळ म्हणूं नकोस."

" काय म्हणून म्हणूं नको ? " गिरिजाया म्हणाली, " एकदां म्हणेन,—दहादां म्हणेन,—शंभरदां म्हणेन—हजारदां म्हणेन—" बोलत बोलत तिनें बिछायतीसाठीं गोळा केलेला पालाचोळा तळ्यांत फेकून देत विचारलें, " कां चांडाळ म्हणूं नये ? कोणत्या अपराधाच्यापायीं त्यांनी तुम्हाला टाकून जावं ? "

" ती माझीच चूक ! " मृणालिनी म्हणाली, " मला माझी हकीगत नीट-रितीनं सांगतां आली नाहीं त्यांना. एक बोलतांना भलतंच बोलून गेलें. "

गिरिजायेनें मृणालिनीला आपलें मस्तक दाबून पहायला सांगितलें त्यावेळीं तिला वेदना झाल्या. गिरिजाया म्हणाली, " आतां कळलं ना ? तूं त्याच्या खांद्यावर मान टाकलीस, त्यानं तुला लोटून दिलं तेव्हां तुझं डोकं दगडावर आपटलं. "

मृणालिनीनें आठवण करायचा प्रयत्न केला, पण तिला त्यावेळीं काय झालें तें आठवेना. तें पाहून गिरिजाया म्हणाली, " फार भाग्यवान आहांत तुम्ही ! एवढं झालं तरी तुम्हाला राग येत नाहीं. "

" मी भाग्यवान आहें खरी ! " मृणालिनी म्हणाली, " कारण हेमचन्द्राची आणि माझी आज गांठभेट झाली. त्यांना मी डोळेभर पाहिलं ! "

●●●

## —: ९ :—

गिरिजाया म्हणाली, " घरीं चला. "

मृणालिनी म्हणाली, " गांवांत कसली गडबड चालली आहे ? "

त्यावेळीं यवनांच्या सेनेनें गांवांत धुमाकूळ माजवला होता. त्या दोघींनींही रस्त्यावर येऊन अंदाज घेतला, पण पुढें जायला त्यांना मार्ग दिसेना. ते यवन इकडे आले तर आपली त्रेधा उडेल म्हणून कुठेंतरी जंगलांत जाऊन आड लपावें असें गिरिजाया म्हणत होती, पण मृणालिनीला तें पटलें नाहीं. ती म्हणाली, " आतांच एक स्वार गेलेला पाहिलास ना ? हेमचन्द्रच ते ! नगरांत तुंबळ लढाई सुरू आहे, त्यांत जर ते एकटेच घुसले असतील तर काय प्रसंग ओढवेल कोण जाणे ! "

गिरिजायेनें यावर कांहींच उत्तर दिलें नाहीं. तिला झोंप येत होती. ती तिथेंच आडवी पडून झोंपी गेली. आहारनिद्रेच्या अभावीं मृणालिनीही थकून गेली होती. पहातां पहातां तीही तिथेंच झोंपी गेली. झोंपेंत तिनें स्वप्न पाहिलें—हेमचन्द्र एकटाच साऱ्या यवनसेनेवर विजय मिळवून आला होता. विजयी वीराला पहाण्यासाठीं मृणालिनी रस्त्यावर उभी राहिली होती. हेमचन्द्राच्या मागेंपुढें हत्ती, घोडे, पायदळ जात होतें. त्यांच्या त्या गर्दींत मृणालिनी पायाखालीं तुडवली गेली—त्यावेळीं हेमचन्द्र आपल्या सिंधी घोडीवरून खालीं उतरून आला आणि त्यानें तिचा हात धरून तिला वर उठवलें. ती हेमचन्द्राला म्हणत होती, "आजवर पुष्कळ हाल सोसले, पण आतां तरी दासीचा त्याग करूं नका." हेमचन्द्र म्हणत होता, "आतां केव्हांही मी तुला दूर करणार नाहीं." तोच आवाज—

ती जागी झाली, "आतां केव्हांही मी तुला दूर करणार नाहीं." जागेपणीं सुद्धां तिला तेच शब्द ऐकूं आले. तिनें डोळे उघडून पाहिलें. काय दिसलें तिला? तिचें तिलाच तें खरें वाटेना. तें स्वप्न नव्हतें—ती सत्य घटना होती—समोर हेमचन्द्र उभा होता. तो म्हणत होता, "पुन्हा एकदां मला क्षमा कर—आतां केव्हांही मी तुला अंतर देणार नाहीं."

निरभिमानी मृणालिनीची आतां लाज ढळली होती. पुन्हा तिनें त्याच्या खांद्यावर मान टाकली.



—: १० :—

मृणालिनीचा चेहरा आतां आनंदानें उजळला होता. तिचा हात धरून हेमचंद्र तिला बागेंतल्या घराकडे घेऊन चालला. हेमचंद्रानें त्यावेळीं तिला धिक्कारलें, पण आतां तोच तिला कवटाळून घेऊन निघाला असें पाहून गिरिजायेला आश्चर्य वाटलें, पण मृणालिनीनें मात्र एका शब्दानेंही खुलासा करून घ्यायचा प्रयत्न केला नाहीं, कीं तोंडावाटे एक शब्दही बाहेर काढण्याचा प्रयत्न केला नाहीं. गिरिजायेला हांक मारायची जरूरी पडली नाहीं. ती स्वतःच त्यांच्यापासून थोड्याशा अंतरानें त्यांच्या मागोमाग चालूं लागली.

बागेंतल्या वाड्यांत येतांच दोघेंही एकत्र बसलीं आणि गेल्या कित्येक दिवसांत घडलेल्या हकिकती एकमेकांना सांगूं लागलीं. आपल्याला संशय कसा आला आणि त्याचें निराकरण कसें झालें तें हेमचंद्रानें जेव्हां मृणालिनीला सांगितलें, त्यावेळीं मृणालिनीनेंही हृषिकेशाचें घर आपण कां टाकलें, नवद्वीपला कोणत्या रीतीनें येणें झालें, ती सारी हकीकत त्याला सांगितली. परस्परांच्या हृदयांत वेगवेगळ्या प्रसंगीं उत्पन्न झालेल्या भावना एकमेकांना व्यक्त करून सांगायला त्यांनीं सुरवात केली. भविष्यकालाचीं सुंदर चित्रें आंखून त्यांनीं एकमेकांपाशीं नव्यानव्या प्रतिज्ञा केल्या. त्या उभयतांत होणाऱ्या संभाषणांत आतां ताळमेळ राहिला नव्हता. त्या भाषणांत असंबद्धता असली तरी ती त्यांना जाणवत नव्हती. हा वेळपर्यंत अडवून धरलेलीं आंसवें आतां मोकळीं होऊं लागलीं होतीं. एकमेकांकडे पहात तीं उगीचच हंसत होतीं. आनंदानें त्या दोघांचीं अंतःकरणें उचंबळून गेलीं होतीं.

पक्ष्यांचा किलबिलाट सुरू झाला तेव्हां त्यांना पहाटेची जाणीव झाली. त्यांना वाटलें, इतक्यांत रात्र कशी संपली ? यवानांच्या आक्रमणामुळें सर्वत्र उफाळलेल्या समुद्रासारख्या कोलाहलाचा प्रतिध्वनि त्यांच्या हृदयसागरांत उठणाऱ्या तरंगाच्या आवाजाखालीं विरून गेला.

त्या वाड्याच्या दुसऱ्या एका बाजूला आणखी एक घटना घडत होती. धन्याच्या हुकुमाप्रमाणें दिग्विजय सारी रात्र जागून घरावर पहारा देत होता. मृणालिनीला घेऊन हेमचन्द्र आला त्यावेळीं त्यानें त्यांना ओळखलें. हेमचन्द्राबरोबर मृणालिनीला पाहून दिग्विजयाला थोडेसें आश्चर्य वाटलें—पण विचारायचें कसें ?

थोड्या वेळानें गिरिजायाही येत असल्याचें त्यानें पाहिलें तेव्हां दिग्विजय आपल्याशींच म्हणाला, " आतां कळलं ! गौड देशांतून ही दोघेंही आम्हां दोघांना भेटायला आलीं आहेत. ती युवराजला भेटायला आली होती, आणि ही मलाच भेटायला आली आहे यांत शंकाच नाहीं ! " असें म्हणून तो मिशीवर ताव देत पुन्हा आपल्याशींच म्हणूं लागला, " कां येऊं नये हिनं ?—तरीपण एक शंका आहे—मोठी खट्याळ आहे ही गिरी ! उभ्या आयुष्यांत कधीं माझ्याशीं एका सरळ शब्दानं बोलत सुद्धा नसे. नुसत्या शिव्या देत असे

मला ! असं जर होतं तर मग ही मला भेटायला यावी कां ? कसं का होईना, एकदां आपण हिची परीक्षा पाहूं. रात्र तर संपली आहे—युवराजही परत आले आहेत—आतां जरा तिची नजर चुकवून झोपीं जावें. पाहूं आतां ही मला शोधून काढते कीं काय ती ?" असा विचार करून दिग्विजय एका कोंपऱ्याला जाऊन झोंप आल्याचें ढोंग करून पडला.

गिरिजायेनें तें पाहिलें होतें. ती आपल्याशींच म्हणाली, 'मी तर मृणालिनीची दासी—मृणालिनी आतां या घरची मालकीण झाली आहे किंवा होईल—आतां हें घर संभाळायचा अधिकार येणार आहे माझ्याकडे !' असें म्हणून तिनें पलीकडे पडलेली झाडू हातीं घेतली आणि ज्या जागीं दिग्विजय झोंपला होता त्या जागीं ती आली.

दिग्विजयानें डोळे मिटून घेतले होते. कुणाची तरी चाहूल लागल्यामुळें त्यानें अंदाज केला कीं गिरिजाया आली. तो फार खूष झाला. एकूण गिरिजायेचें प्रेम आहे तर आपल्यावर ! आतां पाहूं ती काय बोलते ती !

दिग्विजय तसाच डोळे मिटून पडला होता. अकस्मात त्याच्या पाठीवर सपासप झाडूचे फटके बसूं लागले. गिरिजाया आवाज चढवून बोलत होती, "आतां काय म्हणावं ? काय कचरा सांचला आहे हा ? अन् हें काय ? हा कोण गुलाम ? चोर कीं काय ? थांब गुलामा ! राजाच्या घरांत चोरी करायला आला आहेस होय ?" असें म्हणून तिनें सपासप सपाटे हाणायला सुरवात केली.

"अग मी तो—गिरिजाया—अग मी तो !" दिग्विजय ओरडला.

"मी काय !" असें म्हणून तिनें चांगल्याच जोरानें त्याच्यावर केरसुणीचा रट्टा दिला आणि म्हटलें, "तूंच म्हणून देतें आहें हें बक्षीस ! खेटर मारून वोळवण केली पाहिजे चोराची !"

"अग थांब थांब ! अग मी तो दिग्विजय !"

"चोरी करायला आलाय अन् म्हणे मी दिग्विजय ! कुठला रे दिग्विजय केलायस गुलामा ?"

झाडूचे फटके कांहीं थांबत नव्हते.

"मला विसरलीस का ग गिरिजाया ?" दिग्विजय काकुळतीला येऊन म्हणाला.

गिरिजाया म्हणाली, " कुठल्या जन्मीं रे तुझी माझी भेट झाली होती गुलामा ? "

दिग्विजयाला वाटलें, आतां निस्तार नाहीं. आतां रणांगणावरून पळ काढणेंच उचित. त्यानें एकदम तिथून धूम ठोकली. हातीं झाडू घेऊन गिरिजाया देखील त्याच्या मागोमाग धांवत सुटली.

●●●

## —: ११ :—

सकाळींच हेमचंद्र माधवाचार्यांचा शोध करण्यासाठीं बाहेर निघाला, त्यावेळीं गिरिजाया येऊन मृणालिनीपाशीं बसली. आजवर मृणालिनीच्या दुःखाच्या काळांत ती तिची सहभागी होती, आज सुखाच्या काळांत सुद्धां तिनें आपला वाटा कां उचलूं नये ? मृणालिनीच्या सुखसंवादाची कथा तिनें सहृदयतेनें कां ऐकूं नये ?

गिरिजाया एक भिकारीण होती. मृणालिनी एका धनिकाची कन्या होती. दोघांतही समाजदृष्ट्या केवढें तरी अंतर होतें; पण दुःखाच्या दिवसांत गिरिजाया हीच काय ती मृणालिनीची जिवाभावाची आप्त होऊन राहिली होती. अर्थात त्या काळांत तो सामाजिक भेद राहिला नव्हता म्हणूनच आजही गिरिजाया मृणालिनीच्या सुखाच्या काळांत तिच्या सुखाची भागीदारीण ठरली.

मृणालिनीनें सांगितलेली हकीकत ऐकून गिरिजायेला जितकें आश्चर्य वाटलें तितकाच आनंदही झाला. ती म्हणाली, " मग इतके दिवस ही गोष्ट उघड कां केली नाहींत ? "

" राजपुत्रानें मला आजवर निषेध केला होता. " मृणालिनी म्हणाली, " म्हणून मी कांहीं बोललें नाहीं. आतां त्यांची सम्मत्ती मिळाली. आतां बोलायला कांहीं हरकत नाहीं. आतां ऐक माझी हकिगत—माझा बाप एक बौद्ध असलेला सावकार आहे. तो फार श्रीमंत आहे. मथुरेच्या राजाचा तो आवडता आहे. मथुरेच्या राजकन्येची आणि माझी मैत्री होती. एके दिवशीं मी मथुरेच्या राजकन्येबरोबर नौकेंतून यमुनेंत जल-विहार करायला गेलें होतें. एकदम वादळ उठलं आणि आमची नौका पाण्यांत बुडाली. नावाड्यांनीं

राजकन्येला वाचवलं, पण मी मात्र वहात गेलें. माझ्या सुदैवानें एक राजपुत्र त्याचवेळीं होडींतून जात होता—त्यावेळीं त्याला मी ओळखत नव्हतें—तोच हेमचन्द्र! वादळाच्या भीतीनं तो आपली होडी कांठाला लावायला निघाला होता, तितक्यांत पाण्यांत माझे केस दिसल्यामुळं त्यानं स्वतः पाण्यांत उडी घेऊन मला पाण्याबाहेर काढलं. मी बेशुद्ध झालें होतें. हेमचन्द्र मला ओळखत नव्हते. ते देवदर्शनासाठीं मथुरेला आले होते. त्यांनी मला आपल्या निवासांत नेलं आणि माझी शुश्रुषा केली. मी शुद्धीवर आलें तेव्हां मला विचारून घेऊन त्यांनी मला माझ्या बापाकडे पोंचतं करायचं ठरवलं. योगायोगानं असं झालं, कीं तें सुरू झालेलं वादळ अन् पाऊस सारखा तीन दिवस सुरू होता. घराबाहेर पडणं शक्यच नव्हतं. तीन दिवस आम्हीं दोघं एकत्र राहिलों होतों. एकमेकांना एकमेकांचा परिचय झाला—नुसता कुलशीलाचाच परिचय नव्हे—तर एकमेकांच्या अंतःकरणाचा परिचय झाला. त्यावेळीं मी होतें पंधरा वर्षांची—तरीही मी त्या कोंवळ्या वयांतसुद्धां त्यांची दासी होऊन चुकलें. त्या वयांत मला कांहीं कळत नव्हतं. हेमचन्द्र मला देवासारखे वाटत होते. त्यांचा प्रत्येक शब्द म्हणजे मला वेदवाक्य वाटत होतं. त्यांनीं म्हटलं, 'विवाह कर.' मी तें कबूल केलं. चवथ्या दिवशीं वादळ थांबलं. मी त्या दिवशीं उपास केला. दिग्विजयानं सारी तयारी केली. तीर्थयात्रेला निघाल्यामुळं राजपुरोहित बरोबर होते, त्यांनीं आमचं लग्न लावून दिलं—

"कन्यादान कुणी केलं?" गिरजायेनें विचारलें.

मृणालिनी म्हणाली, "अरुंधती नांवाची आमची एक दूरची नातेवाईक बाई होती. ती दूरच्या नात्यानं कां होईना, माझ्या आईची बहीण लागत होती. लहानपणापासून मी तिच्याच आंगाखांद्यावर वाढलें होतें. मी तिचं नांव सांगितलं, तेव्हां दिग्विजयानं तिच्याकडे जाऊन कांहींतरी निमित्त काढून तिला बोलावून आणलं. मी यमुनेंत बुडून मेलें असा अरुंधतीचा समज झाला होता. मी जिवंत आहें असं पाहून तिला आनंद झाला आणि आमच्या म्हणण्याला संमती देऊन तिनें कन्यादान केलं. लग्नविधी उरकल्यावर मी मावशीबरोबर आपल्या घरीं गेलें. मी माझ्या बापाला सारी हकीगत सांगितली, पण लग्न झाल्याचं कांहीं सांगितलं नाहीं. हेमचन्द्र, दिग्विजय, पुरोहित आणि अरुंधती-

मावशी यांच्याखेरीज ही लग्नाची गोष्ट कुणालाच माहीत नाहीं. आज आतां तुला सांगितली. ”

“ माधवाचार्यांनासुद्धां ही गोष्ट नव्हती का माहीत ? ” गिरजायेनें विचारलें.

“ त्यांना कळलं असतं तर सर्वनाश झाला असता ! ” मृणालिनी म्हणाली, “ मग ती हकिगत मगधराजांनाही कळली असती. माझा बाप आहे बौद्ध अन् मगधराज तर बौद्धांचा कट्टा वैरी ! ”

“ मग तुझ्या बापानं अजूनपर्यंत तुझं लग्न कां केलं नाहीं ? ”

“ तसा त्यांचा विचार होता, ” मृणालिनी म्हणाली, “ त्यांचे सारखे प्रयत्न सुरू होते, पण बौद्धांत योग्य वर मिळणं कठीण होतं. बौद्धधर्म त्यावेळीं जवळजवळ लोप होत आला होता. बाबांनीं असं एक स्थळ शोधून काढलं, पण तें माझं हें लग्न झाल्यानंतर. लग्नाची तिथी ठरली असं कळतांच मी ताप घेऊन बसलें अन् त्यामुळें तें स्थळ हातचं गेलं. ”

“ पण तें तापाचं ढोंग पचलं कसं ? ”

“ आमच्या बागेंत एक पडीक विहीर होती. तिच्या सांचलेल्या पाण्यांत स्नान केलं तर हटकून ताप येत असे. त्या विहिरींत रात्रीच्या वेळीं जाऊन मी स्नान केलं अन् त्यामुळं मला ताप आला. पुढं असं झालं, कीं माझी भेट घेण्यासाठीं हेमचन्द्र मथुरेंत रत्नदास वाणी या नांवानं दुकान घालून व्यापारी बनला होता. वर्षांतून एकदां तो या दुकानाच्या चौकशीसाठीं येत असे. त्याच्या गैरहजेरींत दिग्विजय दुकान राखीत असे. त्याला हुकूम देऊन ठेवला होता, कीं मी जें सांगेन तें त्यानं ऐकायचं. अर्थात मी अगदींच असहाय नव्हतें. ”

सर्व हकीकत ऐकून झाल्यावर गिरिजाया म्हणाली, “ मी एक मोठा अपराध केला आहे त्याजबद्दल मला तुम्ही क्षमा केली पाहिजे. तुम्ही सांगाल तें प्रायश्चित मी करीन !—दिग्विजय हा तुमचा हितरक्षक होता हें मला माहीत नव्हतं. आज सकाळीं मी त्याला केरसुणीखालीं चांगला बडवून काढला. मला वाटलं होतं, कीं तो अगदींच हलकट माणूस असावा. आतां मला पश्चा-ताप होतोय !—”

मृणालिनी हंसली आणि म्हणाली, “ मग आतां कसलं प्रायश्चित्त घेणार आहेस ? ”

" भिकाऱ्याच्या मुलीचं लग्न होतं का हो ? " तिनें विचारलें.

" केलं तर होतं ! " मृणालिनी हंसून म्हणाली.

गिरिजाया म्हणाली, " तर मग या हलकटाबरोबर मी लग्न करीन— दुसरं काय करणार ? "

" तर मग मी स्वतः तुला हळद चढवीन. " मृणालिनी हंसून म्हणाली.

●●●

## —: १२ :—

हेमचंद्र माधवाचार्यांच्या वसतिस्थानीं आला तेव्हां ते जप करण्यांत गुंतलेले होते. त्यांना प्रणाम करून तो म्हणाला, " आमचे सर्व प्रयत्न फुकट गेले. आतां या सेवकाला आपला काय हुकूम आहे ? यवनानीं गौड देश काबीज केला. भारतभूमीच्या नशिबांत यवनांचं दास्यच लिहिलंय असं वाटतं, नाहींतर त्यांनीं निर्विवाद गौड देश कसा जिंकला असता ? हा देह पडला तरी चालेल पण या दरवडेखोरांच्या हातून जन्मभूमी मुक्त करावी या उद्देशानं रात्रीं नगरांत गेलों, पण तिथं लढाईच होत नव्हती. एक पक्ष आक्रमण करीत होता अन् दुसरा नुसता पळत होता. "

माधवाचार्य म्हणाले, " वत्सा, वाईट वाटून घेऊं नकोस. नशिबीं असेल तसं व्हायचंच. यवनांचा पराजय होईल असं भविष्य मी वर्तवलंय तें खरं होणारच. यवनांनीं नवद्वीप जिंकलं, पण नवद्वीप म्हणजे कांहीं गौड देश नव्हे. मुख्य राजा सिंहासन टाकून पळाला, पण या राज्यांतले अनेक मांडलीक राजे आहेत ते अजून जिंकले गेले नाहींत. ते एकत्र होऊन पुढं आले तर यवनांचा पराजय होणार नाहीं कशावरून ? भविष्य खोटं होणार नाहीं. गौडराज्य म्हणजे कांहीं पूर्वेचा गौड नव्हे—कामरूप म्हणजेच पूर्वगौड. मला वाटतं, तिथंच आमची आशा पूर्ण होईल. "

हेमचंद्र म्हणाला, " पण सध्या तरी यवन कामरूपांत जायचा संभव दिसत नाहीं. "

माधवाचार्य म्हणाले, " गौड देशांत स्थिरस्थावर झालं कीं ते कामरूपावर आक्रमण करतील. "

" तेंही मी कबूल करतों. " हेमचंद्र म्हणाला, " कामरूपावर ते आक्रमण करतील हेंही कबूल करतों, पण त्यामुळं कांहीं माझ्या बापाच्या राज्याचा उद्धार व्हायचा संभव दिसत नाहीं. "

माधवाचार्य म्हणाले, " यवनलोक सारखे जय मिळवताहेत खरे, पण हें कांहीं असंच चालणार नाहीं. भारतवर्षातील सारे आर्यवंशीय राजे हातीं शस्त्र धरतील तर त्यांच्यापुढं यवनांचा किती वेळ टिकाव लागेल ? "

हेमचन्द्र म्हणाला, " गुरुदेव, आपण आशावादी आहां, मीही आशा धरून आहें—आतां मी काय करूं तें मला सांगा. "

" आतां इथं रहाणं धोक्याचं आहे. " माधवाचार्य म्हणाले, " यवन तुझ्या जिवावर उठतील. आजच्या आज तूं हें नगर सोडून जा. माझ्याबरोबर कामरूप देशांत चल. "

हेमचन्द्रानें मान खालीं घातली. ओशाळल्यागत होऊन तो कांचरत म्हणाला, " मृणालिनीला कुठं ठेवून जाऊं ? "

आश्चर्यचकित होऊन माधवाचार्य म्हणाले, " म्हणजे ? कालच्या प्रकरणानंतर तूं मृणालिनीचं नाव सोडलंस असं मला वाटलं होतं ! "

" मृणालिनीला मला टाकतां येत नाहीं. " हेमचन्द्र म्हणाला, " ती माझी विवाहित स्त्री आहे. "

माधवाचार्य चकित झाले. थोडेसे रागावलेही. ते चिडून म्हणाले, " आजवर मला हें कां कळवलं नाहींस ? "

हेमचन्द्रानें त्यावेळीं आपल्या विवाहाबद्दलची सर्व हकीकत सांगितली. ती ऐकल्यावर ते क्षणभर स्तब्ध राहिले. नंतर म्हणाले, " दुराचारी स्त्री विवाहित असली तरी तिचा त्याग करणंच इष्ट. कालच तिचं चारित्र्य मी सांगितलं ना तुला ? "

त्यावेळीं हेमचन्द्रानें व्योमकेशाचा सारा इतिहास आचार्यांना सांगितला. तो ऐकून ते फार खूष झाले आणि म्हणाले, " वत्सा, मला मोठा आनंद झाला. तुझ्या गुणवती स्त्री पासून तुला मी दूर ठेवलं, तुला अनेक क्लेश दिले, आतां आशीर्वाद देतों, तुम्ही दीर्घजीवी होऊन धर्माचरण करीत रहा. आतां तूं तिला सोडून माझ्याबरोबर येऊं नकोस. आधीं मी कामरूपला जातों आणि योग्यवेळीं

तिथल्या राजाचा दूत तुझ्याकडे पाठवतों. तोपर्यंत तूं आपल्या वधूला घेऊन मथुरेला जाऊन रहा किंवा दुसऱ्या कुठंही सुरक्षित जागीं रहा."

माधवाचार्यांचा निरोप घेऊन हेमचन्द्र तिथून निघाला. भरल्या डोळ्यांनीं माधवाचार्यांनीं त्याला हृदयाशीं कवटाळून धरून आशीर्वाद दिल्यावर निरोप दिला.

● ● ●

## -: १३ :-

ज्या रात्रीं राजधानींत यवनांच्या सेनेनें धुमाकूळ माजवला होता त्या रात्रीं पशुपती तुरुंगांत कोंडून पडलेला होता. रात्र संपली आणि त्याच वेळीं ती दंगलही संपली, तेव्हां महमदअली पशुपतीला भेटायला आला. पशुपती म्हणाला, "आतां तुझ्या मिठास बोलण्याला मी फसणार नाहीं. एकदां तुझ्यावर विश्वास ठेवून मी असा संकटांत पडलों. आतां मला तुझं भाषण ऐकायला नको आहे."

"मी माझ्या मालकांच्या हुकुमानं आलों आहें." महमदअली म्हणाला, "आपण यावेळीं यवनवेष घेतला पाहिजे."

पशुपती म्हणाला, "मला मृत्यू आला तरी बेहत्तर, पण मी यवनधर्म स्वीकारणार नाहीं."

"मी आपल्याला यवनधर्म स्वीकारायला सांगत नाहीं! यवनांचा पोषाख घालायला सांगतों आहें."

"मी ब्राह्मण आहें." पशुपती म्हणाला, "मी काय म्हणून म्लेंच्छांचा वेष धारण करूं?"

"स्वेच्छेनं हा वेष आपण घेतला नाहीं तर आम्ही जबरदस्ती करूं. नाकबुलीच्या पोटीं अपमान करून घ्यावा लागेल!"

पशुपतीनें उत्तर दिलें नाहीं. महमदअलीनें स्वतः त्याच्या अंगावर यवनवेष चढवला आणि आपल्याबरोबर यायला सांगितलें.

"कुठं जायचं आहे?" पशुपतीनें विचारलें.

"आपण कैदी आहां," महमदअली म्हणाला, "विचारण्याची काय जरूरी?"

महदअली पशुपतीला घेऊन सिंहद्वारावर आला. पशुपतीचा रक्षकही त्यांच्याच बरोबर आला होता. सिंहद्वारावर आल्यावर महमदअलीनें तिथल्या पहारेकऱ्यांना घालवून दिलें. सिंहद्वार ओलांडून ते तिघेही राजरस्त्यावरून बाहेर आले तेव्हां महमदअली म्हणाला, "पशुपती, मी निर्दोष आहें. मला आपण उगीच दोष दिला. बख्त्यारखिलजीचं हें कपट मला माहित नव्हतं. तें माहित असतं तर मी मध्यस्थाचं काम पत्करलं नसतं. आतां मी माझ्या पापाचं प्रायश्चित्त करणार आहें. गंगातीरावर होडी तयार आहे. आपण वाटेल तिकडे निघून जा. मी आतां तुमचा निरोप घेतों."

पशुपतीच्या आश्चर्याला सीमा राहिली नव्हती. तो स्तब्ध राहिला होता असें पाहून महमदअली म्हणाला, "आज रात्रीच्या रात्रीं आपण हें नगर सोडून जा. उद्यां सकाळीं यवनानीं आपल्याला पाहिलं तर दुर्धर प्रसंग ओढवेल. खिलजीच्या हुकुमाविरूद्ध मी वागलों तें या पहारेकऱ्यानं पाहिलं आहे. अर्थात माझ्या बचावासाठीं मला या पहारेकऱ्यालाही घालवून देणं भाग आहे. यालाही आपल्या बरोबर न्या." असें म्हणून महमदअली निघून गेला.

आश्चर्यचकित झालेला पशुपती गंगातीराकडे निघाला.

• • •

## —: १४ :—

महमदअलीचा निरोप घेऊन पशुपती रस्त्यानें जात असतां त्यानें जें दृश्य पाहिलें त्यामुळें तो मनांतल्या मनांत मेल्यासारखा झाला. त्याच्या पायाखालीं मुडदे आदळत होते. रक्ताच्या चिखलानें पाय भरून जात होते. दोन्हीबाजूचीं घरें जनशून्य झालीं होतीं. कित्येक जळून खाक झालीं होतीं. मरणाच्या पंथाला लागलेल्या कुणा नागरिकाचें विव्हळणें अजूनही त्याच्या कानीं येत होतें. या सर्व अनर्थाचें मूळ तोच होता. स्वार्थाला बळी पडून त्यानें या राजधानीची मसणवट केली होती. याला शिक्षा म्हणजे देहांत! त्याला वाटलें, महमदअलीला कलंकित करून कां आपण तुरुंगांतून पळालों? त्याला वाटलें पुन्हा जावें आणि मला योग्य शिक्षा कर असें सांगावें.

त्यानें आपल्या इष्टदेवतेचें स्मरण केलें. तो काय मागणार होता तिच्याकडे ? तो थकल्यासारखा होऊन खालीं बसला तो एका प्रेतावर. त्या प्रेतांतून वहाणारें रक्त त्याच्या अंगाला लागलें तेव्हां त्याच्या अंगावर कांटा उभा राहिला. तो ताड्कन् उठला आणि झपाझप चालूं लागला.

त्याला आठवण झाली—आपलें घर ! तें शाबूत राहिलें असेल का अजून ? मनोरमा तिथें लपून बसली होती, तिचें काय झालें असेल ? पशुपती उन्मत्ता-सारखा धांवत सुटला आणि आपल्या वाड्याच्या दाराशीं आला. त्याचा संशय खरा झाला होता. त्याचा वाडा धगधगून पेटत होता. त्याला वाटलें, मनोरमेची हत्या करून यवनांनीं आपल्या घराला आग घातली असावी.

मनोरमा तिथून पळून गेल्याची बातमी त्याला द्यायला तिथें कुणीच नव्हतें. तो हताश झाला. हलाहलाचा कलश कांठोकाठ भरला होता. हृदयांतली शेवटची तार तुटून गेली होती. तारवटलेल्या डोळ्यांनीं त्यानें जळत असलेल्या वाड्याकडे पाहिलें—दिव्यावर झेंप घेणाऱ्या पतंगासारखी त्यानें त्या जळत्या खाईत झेंप घेतली. त्याच्या बरोबरचा पहारेकरी थक्क होऊन गेला.

त्या जळत्या घरांत जळत्या दारांतून पशुपती आंत शिरला. त्याचे पाय पोळले — अंग भाजलें—पण तो मागें फिरला नाहीं. तसाच तो आपल्या शेज-घरांत गेला. तिथें कुणीच नव्हतें. देहाला आगीचे चटके लागत असतां तो या खोलींतून त्या खोलींत धांवत जात होता. हृदयांत पेटत असलेल्या अग्नीपुढें बाहेरच्या ज्वाळांची त्याला जाणीव होत नव्हती.

वाड्याचा एकेक भाग कोसळून पडत होता. मोठा कडकडाट होऊन आगीची ज्वाळा आकाशाला भेदून टाकीत होती. तो धूरानें गुदमरून गेला होता. आगीच्या ठिणग्या चोंहीकडून त्याच्या अंगावर उडत होत्या, तरीही तो वाड्यांतल्या माणसांचा शोध करीत इकडे तिकडे धांवत होता, पण कुणाचाच शोध लागला नाहीं. हताश होऊन तो देवीच्या मंदिरांत आला. त्या मंदिरा-नेंही आतां पेट घेतला होता. त्या पेटलेल्या खाईत देवीची सुवर्णप्रतिमा तेवढी शाबूत होती. ती प्रतिमा पहातांच पशुपती उन्मत्त होऊन ओरडला, "आई, जगदम्बे, या पुढें मी तुला जगदम्बा म्हणणार नाहीं. तुझी पूजा करणार नाहीं. तुला प्रणाम करणार नाहीं. बाळपणापासून मी जीव टाकून तुझी

सेवा केली—ती सेवा या जन्मींच संपली—आतां आई, एक दिवसाच्या पापासाठीं सर्वस्व हरवून बसलों. आतां तुझी पूजा काय म्हणून करूं ? ही पापाची वृत्ती माझ्याठायीं कां उत्पन्न होऊं दिलीस ?—”

आगीचा भडका उठला होता. मंदिर कोसळून पडत होतें. तरीही पशुपती प्रतिमेला उद्देशून बोलत होता, “पहा पहा! धातुमूर्ती! तूं नुसतीच धातुमूर्ती—देवी नव्हेस—ही ऐक अग्नीची गर्जना ! ज्या वाटेनें माझी प्राणप्रिया गेली त्याच वाटेनं आतां तुला पाठवून देतों. मीच तुझी स्थापना केली, मीच तुझं विसर्जन करतों. चल—इष्टदेवते, आतां तुला नेऊन गंगेंत बुडवतों. “ असें म्हणून पशुपतीनें प्रतिमा दोन्हीं हातांनी कवटाळली.

त्याच वेळीं पुन्हा आगीचा लोळ उठला. धरणीकंपासारखा प्रचंड शब्द झाला. धूराचे लोट आकाशाकडे गेले. असंख्य ठिणग्या उडवीत तें पेटलेलें मंदिर जमिनदोस्त होऊन पडलें.

त्या मंदिरांत प्रतिमेसहित पशुपतीला सजीव समाधी मिळाली.

● ● ●

## —: १५ :—

पशुपती अष्टभूजा देवीची पूजा जरी स्वतःच करीत असे तरी तिच्या सेवेसाठीं त्यानें दुर्गादास नांवाचा एक ब्राह्मण नेमला होता. विध्वंसाच्या दुसऱ्या दिवशीं तो पशुपतीच्या वाड्याकडे आला तेव्हां तो वाडा जळून खाक झाला असल्याचें त्याला दिसलें. वाड्याच्या राखरांगोळींतून अष्टभुजा देवीची मूर्ती शोधून काढून आपल्या घरीं नेऊन तिची स्थापना करण्याचें त्यानें ठरवलें. कोसळलेल्या विटा आणि दगड उचलून काढण्यासाठीं त्यानें आपल्या मुलाला बोलावून आणलें. विहिरीचें पाणी काढून त्या दोघांनीं ती आग विझवली आणि त्यांतून देवीची प्रतिमा बाहेर काढली. त्या प्रतिमेच्या पायापाशीं—हें काय ? घाबरून त्या दोघांनीं पाहिलें—तो मनुष्याचा मृत देह होता. त्यांनीं तो मुडदा उचलून पाहिला तेव्हां तो पशुपतीचा आहे हें त्यांनीं ओळखलें. आपलें कर्तव्य पार पाडण्यासाठीं त्यांनी पशुपतीचा देह उत्तरक्रिया करण्याच्या उद्देशानें गंगातीरावर नेला.

या विधीसाठीं अवश्य असलेली सर्व सामग्री गोळा करून आणून त्यांनीं पशुपतीचा देह चितेवर ठेवला आणि अवश्य तो मंत्रविधी केला. आतां ते त्या चितेला अग्नी देणार होते तोंच—

स्मशानभूमींत ही कोण आली ? ते दोघेही ब्राह्मण चकित झाले. धूळ भरलेल्या अंगानें एक उन्मादिनी स्मशानांत आली. तें पाहून दुर्गादासानें विचारलें, " कोण तुम्ही ? "

" कुणाची उत्तरक्रिया चालली आहे ही ? " तिनें विचारलें.

" धर्माधिकारी पशुपतीची ! " दुर्गादास म्हणाला.

" पशुपतीला मृत्यू कसा आला ? " तिनें विचारलें.

दुर्गादास म्हणाला, " पशुपती तुरुंगांत पडले होते. तिथून पलायन करून ते आपल्या वाड्यापाशीं आले असं मला कुणी सांगितलं. वाडा जळत असलेला पाहून देवीची मूर्ती बाहेर काढण्यासाठीं ते आंत गेले असावेत—त्या मूर्तीपाशींच मला त्यांचा हा मृतदेह मिळाला. "

यावर ती कांहीं बोलली नाहीं. गंगातीरावरच्या वाळवंटांत तिनें बसकण मारली. बराच वेळ ती मुकाट बसली होती. नंतर तिनें विचारलें, " तुम्ही कोण ?"

" आम्ही ब्राह्मण. " दुर्गादास म्हणाला, " आम्ही त्यांच्याच अन्नावर वाढलों. आपण कोण ? "

" मी त्यांची पत्नी ! " ती म्हणाली.

दुर्गादास म्हणाला, " त्यांची पत्नी फार वर्षांपासून नापत्ता झाली होती. आपण त्यांच्या पत्नी कशा ? "

" ती नापत्ता झालेली केशवकन्या मीच ! " ती म्हणाली, " केलेलं भाकित पुरं करण्यासाठीं आज मी इथं आलेय. " तें ऐकून ते दोघेही भयभीत झाले. ते बोलत नाहींत असें पाहून ती म्हणाली, " आतां पुढल्या तयारीला लागा. मला माझं कर्तव्य केलं पाहिजे."

तिचा उद्देश ध्यानीं येऊन दुर्गादास म्हणाला, " मुली, तूं बालिका आहेस. या दुर्धर प्रसंगांत पडायला कां तयार होतेस ? "

ती त्यांना दरडावून म्हणाली, " तुम्ही ब्राह्मण ना ? मग मला अधर्माला कां प्रवृत्त करतां ? माझी सती जायची तयारी करा. "

तिचा निर्धार पाहून पुढल्या तयारीसाठीं तो ब्राह्मण नगरांत जायला निघाला त्यावेळीं ती त्याला म्हणाली, " तुम्ही गांवांत जात आहां. तिथं बगीच्यांतल्या वाड्यांत हेमचंद्र नांवाचा एक राजपुत्र रहातोय. त्याला सांगा, मनोरमा गंगातीरावर सती जायला निघाली आहे. त्यापूर्वी तिला एकदां भेटून जा. "

ब्राह्मणाच्या तोंडून ती बातमी कळली तेव्हां हेमचंद्र बावरल्यासारखा झाला. दुर्गादासच्या बरोबर तो गंगातीरावर आला. मनोरमेची ती गंभीर पण उन्मादिनी मूर्ती पाहातांच त्याच्या डोळ्यांतून आसवांचा पाझर सुटला. तो म्हणाला, " मनोरमा ! भगिनी ! हें काय चाललं आहे ? "

मनोरमा गंभीरवाणीनें म्हणाली, " भाई, आज माझ्या जीवनाचं सार्थक झालंय. आज मी माझ्या पतीबरोबर सहगमन करतें आहें ! "

तिने हेमचंद्राला एका बाजूला घेतलें आणि आपली सर्व पूर्वकथा सांगून झाल्यावर ती म्हणाली, " माझ्या पतीनं अपरिमित धनसंचय करून ठेवला आहे. मी आतां त्याची मालकीण आहें. ती सारी संपत्ती मी तुम्हाला देतें आहें तिचा तुम्ही स्वीकार करा, नाहींतर ती यवनांच्या हातीं पडेल. त्यांतला कांहीं भाग जनार्दन शर्मा याला देऊन त्यांना काशीक्षेत्रीं स्थापन करा. हा विधी पूर्ण झाल्यावर तुम्ही माझ्या पतीच्या घरीं जा आणि मी सांगतें त्या जागीं खणून पाहून तिथली संपत्ती ताब्यांत घ्या. माझ्याखेरीज ती जागा दुसऱ्या कुणालाही माहीत नाहीं. " असें म्हणून तिनें त्या जागेचा ठावठिकाणा हेमचंद्राला सांगितला.

जनार्दनशर्मा आणि त्यांची पत्नी यांना प्रणाम सांगून तिनें हेमचन्द्राचा निरोप घेतला. ब्राह्मणानीं आणलेलें नूतन वस्त्र तिनें परिधान केलें. फुलांचा हार कंठांत घालून पशुपतीच्या प्रज्वलित चितेला तिनें प्रदक्षिणा केली आणि ती चितेवर चढली. हंसतमुखानें ती त्या चितेवर जाऊन बसली होती.

धगधगत्या अग्निज्वाळेंत फेंकलेल्या फुलाच्या कळी सारखी मनोरमा प्राणत्याग करती झाली.

● ● ●

# परिशिष्ट

मनोरमेनें दिलेली संपत्ती शोधून काढून हेमचन्द्रानें त्यांतला कांहीं भाग देऊन जनार्दनशर्मांची काशीला पाठवणी केली. उरलेली संपत्ती स्वीकारायची कीं नाहीं याचा त्याला प्रश्न पडला होता. त्यानें माधवाचार्यांना विचारलें तेव्हां ते म्हणाले, "पशुपतीचा नाश करणाऱ्या बख्त्यार खिलजीचा सूड उगवण्यासाठीं ती संपत्ती तूं ताब्यांत घे. दक्षिणेकडे समुद्र किनाऱ्यावर बराच जनहीन प्रदेश आहे, तिथं यवनांचा संहार करायला सैन्य उभें कर."

त्याच रात्रीं हेमचन्द्राला घेऊन माधवाचार्य दक्षिणेकडे निघाले. जातांना त्यांनी पशुपतीची सारी दौलत गुप्तपणें आपल्या बरोबर नेली होती. मृणालिनी, गिरिजाया आणि दिग्विजय हींही त्यांच्याबरोबरच गेलीं. अर्थात हेमचन्द्रही त्यांच्या बरोबरच होता. नव्या राज्याची स्थापना करणें कठिण गेलें नाहीं. यवनांच्या धर्मद्वेषामुळें त्रस्त झालेले वेगवेगळ्या ठिकाणचे नागरिक हेमचन्द्रानें स्थापन केलेल्या राज्यांत वसती करण्यासाठीं आले. त्यांत बरेच संपन्न धनिकही होते. थोड्याच काळांत हें छोटें राज्य भरभराटीला आलें. हळुहळु सैन्य उभारायला सुरवात झाली.

त्या रमणीय राजधानींत मृणालिनी राणी म्हणून विराजमान झाली. गिरिजायेचें दिग्विजय बरोबर लग्न झालें. तीं उभयतां मृणालिनीचीं सेवक होऊन राहिलीं होतीं. दररोज एकदांतरी गिरिजायेनें केरसुणीचा फटका दिला नाहीं तर दिग्विजय म्हणे, "गिरी, आज अशी रागावलीस कां?" आणि मग तिनें एकदां केरसुणीचा फटका दिला कीं त्याचें समाधान होई.

हेमचन्द्राच्या नव्या राज्याची स्थापना करून माधवाचार्य कामरूप देशांत गेले. त्याचवेळीं हेमचन्द्रानें दक्षिणेकडून मुसलमानांवर हल्ला करायला सुरवात केली होती. बख्त्यार खिलजी पराभूत होऊन कामरूप देशांतून पळाला. वाटेंत हाल हाल होऊन त्याला मरण आलें. तो सर्व इतिहास या ग्रंथांत देण्याची जरूरी नाहीं.

माधवाचार्यांना सांगून मृणालिनीनें हृषिकेशाला आपल्या राजधानींत आणलें आणि मणिमालिनीला तिच्या पतीसह राजवाड्यांत स्थान दिलें. तिथें राजपुरोहित म्हणून मणिमालिनींच्या पतीची नियुक्ती करण्यांत आली.

हिंदूंचें राज्य उभें राहायची आशा नाहीं असें पाहून चतुर शांतशीलानें यवनांच्या गोटांत प्रवेश केला. हिंदूंवर अत्याचार करण्यांत यवनांना जोड देऊन त्यांच्या राज्यांत त्यानें मानाची जागा पटकवली.

